मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणें.

# महाराष्ट्रकाव्यग्रंथ.

५.

श्रीजयरामस्वामी वडगांवकरकृत

## अपरोक्षानुभव.

जुन्या हस्तलिखित प्रतींच्या आधारें

**विनायक लक्ष्मण भावें**, बी. एस्‌सी.,

यांनीं

'महाराष्ट्रकवि' या मासिक पुस्तकांत छापून प्रसिद्ध केला.

शके १८२७.

# प्रस्तावना.



श्रीजयरामस्वामी वडगांवकरांच्या 'अपरोक्षानुभवा'च्या आम्हांस दोन प्रति मिळाल्या. यांपैकीं एक प्रत रा. रा. आत्माराम पुरुषोत्तम आंबेकरा यांचेकडोन मिळाली. ही सुमारें ९$\frac{1}{2}$ इंच लांब व ५$\frac{1}{4}$ इंच रुंद असून, हिचीं एकंदर १४५ पानें आहेत. हिचें अक्षर सुवाच्य असून अलीकडलेंच आहे. या प्रतीचे शेवटीं 'शके १७४४ चित्रभानुनाम संवत्सरे श्रावण शुक्ल त्रयोदशीं सौम्यवारेण समाप्त । हस्ताक्षर महिपतिभट धांदरफळ प्रगणे संगमनेरकरेण लिखितं.' असा प्रतीच्या कालाचा व लेखकाचा उल्लेख आहे.

दुसरी प्रत रा. रा. उमाकांत सदाशिव देशमुख, वास्तव्य उमरावती, यांजकडून मिळाली. हिची लांबी ७$\frac{3}{4}$ इंच व रुंदी ४$\frac{1}{2}$ इंच आहे. हिचीं पानें १८६ आहेत. या प्रतीचे शेवटले पानाचे मागचे बाजूस 'ही प्रत शके १७२५ अश्विन वद्य १३ दशीस केली' असें म्हटलें आहे.

२. नगर जिल्ह्यांत कात्राबाद मांडवण या नांवाचें एक लहानसें गांव आहे. तेथें भिकाजीपंत केशर या नांवाचे एक गृहस्थ तेथील देशपांडेपणाची वृत्ति संभाळून रहात असत. भिकाजीपंतांच्या स्त्रीचें नांव कृष्णाबाई. हीं दोघें गरीबी असूनही फार संतोषवृत्तीनें असत. यांस वृद्धापकाळीं एक पुत्र झाला. त्याचें नांव जयराम. हाच पुढें जयरामस्वामी वडगांवकर या नांवानें प्रसिद्धीस आला.

३. जयरामस्वामीच्या आजेगुरूचें नांव शांतेश्वरमहाराज. हा जातीनें लिंगाईत जंगम होता. असें असूनही हा अद्वैतमताचा पूर्ण अभिमानी असल्यामुळें 'शिव' व 'विष्णु' या दोन्ही मूर्तींची पूजा करी. शिखर शिंगणापूर येथें याचें स्थान आहे. येथें अद्यापिही एकाच सभामंडपांत

दोन्ही मूर्ति असून त्यांची पूजाअर्चा यथास्थित चालते. या शांतेश्वराचा शिष्य कृष्णाप्पास्वामी. हा मान देशांतील राहणारा. उपनांव अभ्यंकर. लहानपणींच आईबाप मृत्यु पावल्यावर यानें शांतेश्वराचा उपदेश घेतला. उपदेशदीक्षेनंतर कांहीं दिवस शांतेश्वराच्या समागमें राहिल्यावर शांतेश्वरानें यास आज्ञा केली कीं, "आतां तुझी सेवा पूर्ण झाली; तरी आतां मठ स्थापून आराधना करावी." या आज्ञेप्रमाणें कृष्णाप्पा निघून तीर्थयात्रा करूं लागला. तो एक दिवस फिरत फिरत कृष्णातीरीं, कृष्णेपासून पांच कोसांवर वडगांव म्हणून गांव आहे, तेथें आला. वडगांव गांव अगदीं लहान, कुग्रामवस्ती व भोंवतीं झाडीही फार असें पाहून तेथील गांवाबाहेरचे महादेवाचे देवळांत महाराज उतरले. चार दोन दिवस जातां तेथील पाटील कुब्जाबावा यांनीं महाराजांची वृत्ति पाहून त्यांस तेथेंच राहवून घेतलें. यापुढें कृष्णाप्पाची वस्ती वडगांवींच झाली. याप्रमाणें वडगांवच्या मठाची स्थापना झाली.

४. वर सांगितलेले भिकाजीपंत देशपांडे यांचा पुत्र आठ वर्षांचा असतांच भिकाजीपंत वारले. घरची गरीबी, तेव्हां मातोश्रीनें भिक्षा मागून आपल्या मुलाची मुंज केली. पुढें मातोश्री वारली, व जयराम पंढरपुरीं येऊन राहिला. गावांत मधुकरी मागून यानें विद्याभ्यास केला व गीर्वाण भाषेचेंही ज्ञान संपादन केलें. येथून जोगाईचे आंब्यास जाऊन तेथें देवीची उपासना केली व पुढें कांहीं दिवसांनीं पुन्हा पंढरपुरास आला. पंढरपुरास श्रीविठ्ठलाचा साक्षात्कार झाल्यावरून यानें वडगांवास जाऊन कृष्णाप्पास्वामींचा उपदेश घेतला. यापुढें जयरामस्वामी वडगांवासच रहात असे.

५. पंढरपुरास ज्या ठिकाणीं जयरामस्वामींनीं तपश्चर्या केली व त्यांना विठ्ठलाचा साक्षात्कार झाला, तें ठिकाण अजूनही लोक दाखवितात. व याच ठिकाणीं मठ बांधिला आहे. तसेंच वडगांवीं देवळांत ज्या खांबा-

जवळ जयरामस्वामी बसत असत व जेथें त्यांस श्रीकृष्णाप्पास्वामींनीं अनुग्रह दिला तो खांबही अजून दाखवितात. या खांबावर विठ्ठलाच्या मूर्ति काढल्या आहेत; लोक प्रथमतः या खांबाचें दर्शन घेऊन नंतर देवळांत श्रीमहादेवाचें दर्शन घेतात.

६. कृष्णाप्पास्वामींची भेट होण्यापूर्वी त्या काळाला योग्य असा नित्यपाठाचा सर्व अभ्यास जयरामस्वामीचा झाला होता. संस्कृत भाषेचेंही ज्ञान यानें पूर्वीच संपादन केलें होतें. कृष्णाप्पास्वामींचे सहवासानें ज्ञानेश्वरादि महाराष्ट्र ग्रंथकारांच्या कृतीकडे याचें मन वळलें. कृष्णाप्पाची कृति हल्लीं फारशी उपलब्ध नाहीं. परंतु मराठी ग्रंथांवर कृष्णाप्पाचें प्रेम फार होतें. समाधि घेतांना 'ज्ञानेश्वरी'चा नववा अध्याय समाधींत पुढें ठेवून नंतर यांनीं आसन मांडिलें, अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे.

७. कृष्णाप्पास्वामींनीं शके १५४९ त जीवंत स्थळसमाधि घेतल्यानंतर जयरामस्वामींकडे मठाचा अधिकार आला. यावेळीं जयरामस्वामी भजनपूजन करून केवळ उदासीन वृत्तीनें राहत असे. परंतु पुढें श्रीसमर्थ-रामदासस्वामींची व याची भेट झाली, तेव्हां रामदासांनीं सांगितलें कीं, "बाप्पा, असें उदासीनवृत्तीनें राहणें नीट नाहीं. ब्रह्मचर्यव्रत पाळून सर्व इच्छांचा न्यास केला हें ठीक केलें. तरी आतां चित्तांत वैराग्य ठेवून मठांची स्थापना करावी, व सांप्रदाय वाढवून जेणेंकरून जगताचे मनोरथ पूर्ण होतील व संतोष वाढेल असेंच करावें." या वेळेपासून जयरामस्वामींनीं सांप्रदाय वाढवला, ग्रंथ लिहिले, शिष्यसमुदाय मिळवला व जगाचे उद्धारार्थ यत्न सुरू केले. म्हसवडकर माने, कुरलेकर राजे, औंधचे प्रतिनिधि वगैरे मराठेमंडळांत जयरामस्वामीचा उपदेश चाले; व ही मंडळी जयरामस्वामीला फार मान देई. जयरामस्वामी विरक्त वृत्तीनें राही, तरी बसावयास घोडा स्वामीबरोबर नेहमीं असे. जयरामस्वामीचा पट्टशिष्य गोपाळ अथवा गोपाळबावा हा अश्वविद्येंत निपुण होता. आपल्या वेळच्या

सर्व साधुमंडळांत जयरामस्वामीचा रंगनाथस्वामी निगडीकरावर विशेष लोभ असे. पत्रांतदेखील हे एकमेकांस अनुक्रमें ' चिरंजीव ' व ' तीर्थस्वरूप ' असें लिहीत.

८. जयरामस्वामीच्या व दासपंचायतनांतल्या पुरुषांच्या भेटींसंबंधें व इतर अनेक आख्यायिका आधुनिक चरित्रांतून प्रसिद्ध आहेत.

९. जयरामस्वामीची काठी बळकट असून तो वर्णानें गोरा व फार तेजःपुंज असा होता. जयरामस्वामींच्या स्वरूपासंबंधें व समाधिकालासंबंधें पुढील दोन श्लोक प्रसिद्ध आहेतः—

गौरा यस्य तनुर्महोदर उदासोऽयं सुकौपीनधृक्
श्रीकृष्णेति वदन्समाधिनिरतो नित्यस्वरूपे स्थितः ।
ब्रह्मानंदमयः सतामभयदोऽभीष्टप्रदः शंकरः
सोऽयं श्रीजयरामसद्गुरुवरः पायादपायात्सदा ॥

शालीवाहनके विरिंचिमुखतोभक्तिप्रपंचोऽब्दके
तत्र श्रीपरिधाविवत्सरवरे दाक्षिण्यमार्गे रवौ ।
मासे प्रोष्ठपदे शिते हरिदिने जीवाव्हये वासरे
सोऽयं श्रीजयरामयोगितिलको ब्रह्मस्वरूपो बभौ ॥

१०. जयरामस्वामी शके १५९४ मध्यें परिधावि संवत्सरीं भाद्रपद शुक्ल ११ स समाधिस्थ झाला. जयरामस्वामीच्या गुरुपरंपरेची वंशावळ पुढें परिशिष्टरूपानें दिली आहे.

११. जयरामस्वामींनीं लिहिलेले पुढील ग्रंथ वडगांव येथील मठांत आहेतः—

१. श्रीमद्भागवतदशमस्कंधटीका.

२. रुक्मिणीस्वयंवर.

३. सीतास्वयंवर.

४. ज्ञानीभक्तसंवाद.

५. शांतिपंचीकरण.

६. अपरोक्षानुभव.

यांपैकीं शेवटील दोन ग्रंथ मात्र छापले आहेत. बाकी सर्व अजून छापावयाचे आहेत. जयरामस्वामींच्या परंपरेपैकीं कृष्णाप्पास्वामींचीं कांहीं पदें मात्र आढळतात. याखेरीज कोणाचीही कांहीं कृति असल्याचें आढळून येत नाहीं.

१२. वर दिलेली माहिती वडगांवगादीचे विद्यमान स्वामी विठ्ठलबुवा यांचे जवळच्या लेखी चोपड्या, व त्यांनीं तोंडानें सांगितलेली हकिकत, व 'काव्येतिहाससंग्रहां'तील बखर आणि राजाराम मनोहर यांनीं लिहिलेलें चरित्र यांवरून संमत पाहून दिली आहे.



# परिशिष्ट.

## जयरामस्वामींच्या गुरुपरंपरेची वंशावळ.



# *अपरोक्षानुभव.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगणेश कुळदेवत । सत्य स्वामी श्रीसद्गुरुनाथ । श्रीकृष्णचरणीं प्रणिपात । तेणें कृतार्थ सर्वही ॥ १ ॥ ॐ नमो सद्गुरु स्वराज्यपति । शांतिसिंहासनीं सुखमूर्ति । वंद्य हरिहरां सहजस्थिति । सिद्ध संविति स्वानंदा ॥ २ ॥ स्वानंदस्वराज्य सहजस्थिति । सद्गुरुराजा चक्रवर्ती । सिद्ध शांतिकृपामूर्ति । अभेदभक्ति सुपूजितां ॥ ३ ॥ अंगलग सेवक अनुसंधान । छत्रवरी तन्मय पूर्ण । शून्य लोपूनि चिद्गगन । सहज आपण सुखमय ॥ ४ ॥ हरुषानंदें मंगळवहळीं । शुद्धसत्त्वा चामर ढाळी । सुखें कोंदला सर्वकाळीं । स्वानंदसोहळीं डोलतु ॥ ५ ॥ स्वानुभव सत्यप्रतीति । समाधान विजनाहती । सेवा करी स्वात्मस्थिति । उभा निश्चिति अखंड ॥ ६ ॥ सद्भाव हाचि राज्य करी । तांबूल अनन्य सुरंग मारी । श्रीमुखीं रंगला मुख्यत्वें करी । आवडीवरी महाराज ॥ ७ ॥ विवेक हाचि वेत्रधारी । युक्तिवेत्र झळके करीं । दृश्यवृत्ति बळें मारी । त्यापुढारी येऊं न शके ॥ ८ ॥ महाबोध हा प्रधान । पुढें उभा कर जोडून । आसुरी सैन्य निर्दाळून । जेणें अभिमान मारिला ॥ ९ ॥ विश्वास निजध्यास महाथोर । धैर्य निर्धार हे महावीर । वैराग्य बळि ये झुंजार । उभे निरंतर स्वामीपुढें ॥ १० ॥ सहजपणें सदोदित । सिद्ध स्वानंद अनंत । शांतिसिंहासनीं गुरुनाथ । पूर्ण शोभतु कृपाळू ॥ ११ ॥ शुद्धसत्त्वाहूनि सुंदर । सहजस्थितीचे अलंकार । चिदंबर मनोहर । निर्विकार शोभतु ॥ १२ ॥ निजसामर्थ्यें सामर्थ्यवंत । ज्ञानशस्त्रलखलखित । सत्ता बळें

---

* या ग्रंथाच्या आह्मांस दोन प्रती मिळाल्या आहेत. पैकीं एक रा. रा. **आत्माराम पुरुषोत्तम आंबेकर** मु. कल्याण यांजकडून व दुसरी रा. रा. **उमाकांत सदाशिव देशमुख** बी. ए, एल्. एल. बी. वकील उमरावती यांजकडून, रा. आत्मारामपंतांकडील प्रत सुमारें सहा वर्षांपूर्वी आह्मांस मिळाली. या प्रतींतील अक्षर सुवाच्य असून ही बरीच शुद्ध आहे. दुसरी ह्मणजे रा. देशमुखांकडील प्रत. या प्रतींतील अक्षर साधारण आहे व प्रतही बरीच अशुद्ध लिहिली आहे. जयराम स्वामींनीं याखेरीज सीतास्वयंवर रचलें असून त्यांची श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधावर टीका आहे. त्यांचीं पदें व अभंगही पुष्कळ आहेत.

हातीं वसत । अभिमान गळत ज्या भेणें ॥ १३ ॥ आणि निजात्मता निजमंदिरीं । स्वात्मानुभूति अंतुरी । महापतिव्रता सुंदरी । भक्तिअलंकारीं शोभित ॥ १४ ॥ आंगणीं क्रियासंमार्जन करी । मुक्ति दासी राबती घरीं । वेद आज्ञा वंदी शिरीं । सिद्धि द्वारीं नाचती ॥ १५ ॥ महासिद्ध योगेश्वर । ब्रह्मादिक हरिहर । दास सद्गुरूचे किंकर । स्तुति निरंतर करिताति ॥ १६ ॥ महाराज सद्गुरुनाथ । स्वामी माझा अति समर्थ । मी अनन्य शरणागत । मीपणातीत रूपें तुझिये ॥ १७ ॥ सद्गुरुकृष्णा कैवल्य-नायका । सहजस्थितिसुखदायका । शरण अनन्य तुज एका । सिद्धपादुका अनन्य शरण ॥ १८ ॥ येऱ्हवीं मी तंव अनाथ । तुझिये रूपें जी सनाथ । स्वामी माझा तूं समर्थ । रूपावंत श्रीकृष्णा ॥ १९ ॥ श्रीकृष्णा तुझे चरण । हेंचि एक माझें जीवन । पूर्णसुखाचें निधान । कैवल्य आपण नाम तुझें ॥ २० ॥ मी तुझा अनन्य शरण । तूंच साझें साध्यसाधन । दुजें न देखे तुजवीण । नाठवे मीपण तुजमाजीं ॥ २१ ॥ तव बाप सद्गुरुनाथ । श्रीकृष्णरूपें शिरीं हात । ह्मणे हृदयीं धरिसि आर्त । ते ते यथार्थ परिपूर्ण ॥ २२ ॥ बाप सद्गुरु स्वानंदघन । रूपाळू बोळला कृपेन । ग्रंथीं दिधलें वरदान । स्वानंदपूर्ण वर्षला ॥ २३ ॥ वेदशास्त्रींचा मथितार्थ । रोकडोंचि होवया कृतार्थ । अप-रोक्ष अनुभव हा ग्रंथ । करी कृपावंत श्रीशंकरु ॥ २४ ॥ शंकराचार्य रूपाघन । रूपाळू बोळला रूपेन । भावार्थ चातक आपण । रोकडोंचि पूर्ण निवताति ॥ २५ ॥ अमृत सेवितांचि नर । रोकडाचि होय अमर । तेविं हा ग्रंथ साचार । दे अपार सुखसिद्धि ॥ २६ ॥ कीं जैसा उदेलिया दिनकर । हारपून जाय अंधकार । तेविं ये ग्रंथींचा निर्धार । रोकडी अपार सुखसिद्धि ॥ २७ ॥ माउली रूपें बाळकातें । स्तनीं लावी कुरवाळी हातें । रोकडोंचि पावे तृप्तीतें । करी क्रीडे सुखमय ॥ २८ ॥ तैसेंचि मज श्रीकृष्णें । पुरवूनियां मीपण । स्वानं-दसुखें सुखी करणें । क्रीडानिरोपण टीकामिसें ॥ २९ ॥ सद्गुरुमूर्ति संतजन । भावें आनंदे लोटांगण । अपरोक्षानुभूति ग्रंथ गहन । टीका रूपेनें चालवावी ॥ ३० ॥ बाळकाचा धरूनि हात । माउली टाळिया वाजवीत । स्वयें कौतुकें हांसत । सुखी होय रूपागुणें ॥ ३१ ॥ तंव कृपाळू संतसज्जन । ह्मणती सांडोनि मीतूंपण । टीका चालवी गुरुचरण । हृदयीं पूर्ण धरूनि ॥ ३२ ॥ आतां कथा आनंदलहरी । जे उथलत सद्गुरुसागरीं । श्रीशंकराचार्यवैखरी । अपरोक्ष बरी वदली असे ॥ ३३ ॥ जे संसा-रबंदीं गांजले । जे तापत्रयें तापले । जन्ममरणें निर्बुजले । तिहीं वहिलें येथें यावें ॥ ३४ ॥ तपें व्रतें साधनश्रम । नाना सायासें न फिटे भ्रम । तो निरसिला हे सर्वोत्तम । रूपाळू परम गुरुनाथ ॥ ३५ ॥ तो हा ग्रंथ अपरोक्षानुभूति । बोले आचार्य रूपामूर्ति । स्वानुभव सद्यप्रचीति । सुखसंविति अक्षई ॥ ३६ ॥ हें ह्मणे जयराम कृष्णदास । सद्गुरुरूपें हें रहस्य । सद्गुरु बोलवी टीकेस । महाराष्ट्रभाष्य सद्यःफळ ॥ ३७ ॥ रोकडी अनुभवप्रतीति । ह्मणोनि नाम अपरोक्षानुभूति । शंकराचार्य रूपामूर्ति ।

बोले प्रीती परियेसा ॥ ३८ ॥ श्री ह्मणिजे सुखरूपता । जे स्वरूपस्थितीची तत्वता । सूर्य मिरवे प्रकाशता । रश्मी स्वानंदता जयापरी ॥ ३९ ॥ ऐशी श्री जे स्वानंदता ।

**श्रीरामपरमानन्दमुपदेष्टारमीश्वरम् ।**
**व्यापकं सर्वलोकानां कारणं तन्नमाम्यहम् ॥ १ ॥**

तेणें भक्ता आनंदविता । यालागीं श्रीरामता । परमानंदता परिपूर्ण ॥ ४० ॥ ऐसा सद्गुरु श्रीराम । परमानंद कैवल्यधाम । अनन्य स्मरतां श्रीरामनाम । स्वानंदआराम निजभक्तां ॥ ४१ ॥ तोचि उपदेश करिता ईश्वरु । शांतिसुखदाता सद्गुरु । निरसूनि अज्ञानविकारु । निर्विकार सुखदाता ॥ ४२ ॥ ऐसें सर्व लोकांतें व्यापुन । जैसें तरंगांतें जीवन । ह्मणऊनि सद्गुरुचि कारण । मीपणेवींण नमन तया ॥ ४३ ॥ तो शंकरु आचार्य गुरु । करावया दीनोद्धारु । अपरोक्षज्ञानविचारु । निजनिर्धारु बोधितु ॥ ४४ ॥ अपरोक्षानुभवज्ञान । मोक्षसिद्धीसि कारण । बोले आचार्य रूपाघन ।

**अपरोक्षानुभूतिर्वै प्रोच्यते मोक्षसिद्धये ।**
**सद्भिरेव प्रयत्नेन वीक्षणीया मुहुर्मुहुः ॥ २ ॥**

सावधान अवधारा ॥ ४५ ॥ रोकडी अनुभवप्रतीति । या नांव अपरोक्षानुभूति । बोलले मोक्षसिद्धीप्रती । मुमुक्षी प्रीति सावधान ॥ ४६ ॥ सावधान प्रयत्नपूर्वक । जैसे मेघाचे चातक । तैसे पाहावे अवश्यक । आवडीवर देखे पुनःपुनः ॥ ४७ ॥ अमृत सेवावया-चे चाडे । चकोर पाहे चंद्राकडे । अमृतपान तया घडे । तेवीं रोकडें श्रद्धाळुवा ॥ ४८ ॥ प्रथमारंभापासून । श्रीशंकराचार्य सर्वज्ञ । दाविताहे मोक्षसाधन । स्वानंदपूर्ण भोगा-वया ॥ ४९ ॥ आपुला जो स्वदेह । जयें वर्णाश्रमीं राहे । तेथिंचा स्वधर्म जो आहे ।

**स्ववर्णाश्रमधर्मेण तपसा हरितोषणात् ।**
**साधनं प्रभवेत्पुंसां वैराग्यादिचतुष्टयम् ॥ ३ ॥**

तो करावा पाहे वेदाज्ञा ॥ ५० ॥ राजाज्ञे ऐसें जाण । बरवें विधियुक्त आचरण । असां-गसांगही स्मरण । तुष्टे आपण हरि या तपें ॥ ५१ ॥ राजआज्ञा जो शिरीं धरी । तो सुखें वर्ते संसारी । लक्ष लक्ष व्यापार करी । निर्भय बरी नांदणूक ॥ ५२ ॥ आणि राज-आज्ञा जो न करी । त्यातें राजा नम्र करी । अनेकमारीं यातना करी । बंदीगारीं रक्षण ॥ ५३ ॥ तेवीं महाराज हरि सर्वज्ञ । त्याची आज्ञा वेदवचन । न करी धरी अभिमान । त्यातें बंधन मायामोहो ॥ ५४ ॥ ह्मणऊनि स्ववर्णाश्रमधर्म । तप तें श्रीरामनाम उत्तम । येणें संतुष्ट सर्वोत्तम । साधन सुगम वैराग्य ॥ ५५ ॥ नामें सांग स्वधर्मकर्म । नामें सफळ साधनधर्म । नामेवीण अवघा श्रम । न फिटे भ्रम मायामोहो ॥ ५६ ॥ ह्मणऊनि वेदशास्त्रपुराण । मुख्यत्वें करी नामस्मरण । नामें सार्थक संध्यास्नान । कर्म [illegible] नामांकित ॥ ५७ ॥ तपयज्ञक्रिया सकळा । असांग प्रत्यवायविकळा ।

**यस्य स्मृत्या च नामोक्त्या तपो यज्ञक्रियादिषु ।**
**न्यूनं संपूर्णतां याति सद्यो वन्दे तमच्युतम् ॥ ४ ॥**

हरिनामें प्रताप आगळा । नुन्य त्या केवळा पूर्ण करिती ॥ ५८ ॥ ह्मणऊनि असावें हरीसि शरण । रोकडें आधीं अच्युतमनन । अखंड करितां अच्युतस्मरण । चरणां नमन मोक्ष करी ॥ ५९ ॥ नामप्रतापें वैराग्य उठी । विषयवासना सर्वथा तुटी । नामें निर्मळ विवेकदृष्टि । पडे मिठी नित्यत्वीं ॥ ६० ॥ नामें संतुष्ट सर्वोत्तम । हृदयीं वोळगे शम दम । नाशूनियां क्रोधकाम । सुखसंभ्रम सर्वदां ॥६१॥ श्रीकृष्ण-नामीं जो तन्मय । त्यास उपरति वासनाक्षय । त्यासि घडे मनोजय । अखंड सुखमय तो एक ॥६२॥ करितां श्रीहरीचें स्मरण । स्मरणें तुष्टे नारायण । तरिच सुख-दुःखीं समान । तितिक्षा आपण वोळगे ॥ ६३ ॥ हृदयीं रामनामप्रीति । मुमुक्षा अनुताप चित्तीं । निगमाचार्यवचनोक्ति । त्यासिच भक्ति ठसावे ॥ ६४ ॥ श्रीकृष्णनामीं जो तन्मय । चित्त त्याचें एकाग्र स्वयें । साधन त्याचेचि पाय । सदा सुखमय सेवित ॥ ६५ ॥ नाम महाराज भूपति । साधनें दासी दास्यत्व करिती । नामें कृतकृत्य असाति । भवभ्रांतिनाशक ॥ ६६ ॥ हरिचें नाम हरिच स्वयें । ज्याचे हृदयीं घडे उदय । साधनें अवघीं त्याचे पाय । सदा सुखमय सेविति ॥६७॥ नामचि सूर्य हृदयगगनीं । परिवारला साधनकिरणीं । नामप्रताप त्रिभुवनीं । नांदिजे साधनीं संकळित ॥ ६८ ॥ नामाहूनि साधन श्रेष्ठ । ह्मणे तो जाण परम भ्रष्ट । दृष्टीं न देखावा दुष्ट । पतित नष्ट तो होय ॥ ६९ ॥ तो अधःपाती मूर्ख । त्याचें न पहावें मुख । त्याची संगति नरक । धरी त्या देख घडेल ॥ ७० ॥ स्वधर्म-निष्ठ जो हरिभक्त । नामनिर्धारी विरक्त । आत्मविवेकी शांत । सत्संग सत्य तो एक ॥ ७१॥ असो वेदाज्ञे कर्मानुष्ठान । अखंड करावें हरिस्मरण । हरिरूपें वैराग्य जाण ।

**ब्रह्मादिस्थावरान्तेषु वैराग्यं विषयेष्वनु ।**
**यथैव काकविष्ठायां वैराग्यं तद्धि निर्मलम् ॥ ५ ॥**

होय उत्पन्न आचार्य ह्मणे ॥७२॥ ब्रह्मलोक ब्रह्मादिकरून । स्वर्गमृत्यु पाताळ जाण । आदि ब्रह्मा अंतीं पाषाण । मिथ्या जाणोनि सर्वही ॥ ७३ ॥ अनस्था नैराश्य विषयांचें । या नांव वैराग्य साचें । जैसें पै काकविष्टेचें । प्रेम कैचें जनासि ॥ ७४ ॥ पवित्र न वांछि विटाळा । दरिद्र नावडे भूपाळा । जैशी पतिव्रता बाळा । वैधव्य-कळा न वांछी ॥ ७५॥ ऐशी बुद्धि निश्चयात्मक । निर्मळ हें वैराग एक । असतांही तें मायिक । सोंग देख मर्यादाचें ॥७६॥ वरि दिसे वैराग्यवेश । अंतरीं विषयनिजध्यास । गोमय लाविलें विषेस । पवित्र त्यास कोण ह्मणे ॥७७॥ स्वधर्में हरिनामस्मरणें हृये निष्ठे अनन्य शरण । तयातें तेंचि वैराग्य उत्पन्न । आचार्य आपण बोलिले ॥७८॥ वैराग्यभाग्य

प्रबळ । विवेक उठी निर्मळ । हरिरूपें सुमंगळ । शंकर केवळ ऐका ह्मणे ॥ ७९ ॥

**नित्यमात्मस्वरूपं हि दृश्यं तद्विपरीतगं**
**एवं यो निश्चयः सम्यग्विवेको वस्तुनः स वै ॥ ६ ॥**

नित्य शाश्वत आत्मा पूर्ण । अखंड अद्वैत चिद्घन । अनु नाही दुजेपण । निश्चय आपण बरवा जो ॥ ८० ॥ आणि मिथ्या कल्पना दृश्यभान । विपरीत दिसे जें नसून । या नांव अनित्य जाण । दृश्यभान मृगजळ ॥ ८१ ॥ वस्तुविवेक इयावरी । निर्धारु बरवा निश्चय धरी । अनित्य वृत्ति विवेकें सारीं । धारणा धरी नित्यत्वीं ॥८२॥ संकल्पें मन चंचल परम । निमग्न होय मनोधर्म । त्यालागीं शम दम । आचार्य नेम दावित ॥ ८३ ॥ सदासर्वदां स्फुरण । एकीं अनेकीं कल्पी मन । विवेकें त्यागी

**सदैव वासनात्यागः शमोऽयमिति शब्दितः ।**
**निग्रहो बाह्यवृत्तीनां दम इत्यभिधीयते ॥ ७॥**

तें आपण । सर्वदां पूर्णते सावध ॥ ८४ ॥ जे जे मनीं वृत्ति उठी । आपण तयेच्या पाठीपोटीं । विवेकें व्यापी जगजेठी । उठिले घोटीं वृत्तीतें ॥ ८५ ॥ हरण उडे नानापरी । चित्त चपेट्यासरिसें धरी । बळें विदारूनि मारी । ऐशापरी विवेकवृत्ति ॥ ८६ ॥ वासना निरसूनि मन । समते राहे तो शम हा जाण । आतां दमाचें लक्षण । सावधान अवधारा ॥ ८७ ॥ इंद्रियद्वारा बाह्यवृत्ति । क्रियारूपें जे प्रवृत्ति । नेमें निग्रही तियेप्रती । भजनप्रीति तोचि दमु॥ ८८ ॥ इंद्रियां विधि भगवद्भजन । मनीं मन आत्मचिंतन।हालों नेदी तेथून।शमु दम जाण या नांव॥ ८९ ॥दृढ हा साधनसंभ्रमू।प्रत्यग्वृत्ति लागला नेमू। येणें जाहला उपरमु । सांगे अनुक्रम आचार्य॥ ९०॥ विषयइच्छा आसक्ति ।

**विषयेभ्यः परावृत्तिः परमोपरतिर्हि सा ।**
**सहनं सर्वदुःखानां तितिक्षा सा शुभा मता ॥ ८ ॥**

सांडूनि परतली वृत्ति । जेविं होतां रोगनिवृत्ति । आरोग्यस्थिति पुरुषार्तें ॥ ९१ ॥ विषयइच्छा निरसिली । त्यालागीं उपरति बोलिली । हरिकृपेनें जाहली । वृत्ति परतली विषयांतुनी ॥ ९२ ॥ विषयशक्तीचिया पोटीं । असती सुखदुःखाचिया कोटी । अफूवीण प्राण कंठीं । दुःखकोटी अफूवीण या ॥ ९३ ॥ तेचि तुटतां विषयासक्ति । निष्काम जाहली निजवृत्ति । तैं सुखदुःखें न बाधती । तितिक्ष ह्मणती शुभ हें मन ॥ ९४ ॥ देह मिथ्या प्रारब्धसहित । तेथील सुखदुःख मिथ्याभूत । सहनशक्ति तितिक्षा सत्य । आचार्य सांगत मुमुक्षां ॥ ९५ ॥ दुःखरूप संसारबंधन ।

**संसारबन्धविर्मुक्तिः कथं स्यान्मे कदा प्रभो ।**
**इति या सुदृढा बुद्धिर्वक्तव्या सा मुमुक्षुता ॥ ९ ॥**

कधीं सुटेन यापासून । ऐशी चिंता वाहे पूर्ण । साधनीं मन अनुतापें ॥ ९६ ॥

ह्मणे स्वामी गुरुनाथा । कृपेनें पाहे मज अनाथा । संसारबंधन महाव्यथा । तोडीं तत्वतां ज्ञानशस्त्रें ॥ ९७ ॥ ऐशी जे दृढ बुद्धि जाहली । तये नांव मुमुक्षा बोलिली । ह्मणोनि श्रद्धा धरिली । गुरुवचनीं भली ते ऐका ॥ ९८ ॥ निगम तो वेद प्रमाण ।

**निगमाचार्यवाक्येषु भक्तिः श्रद्धेति विश्रुता ।**
**चित्तैकाग्र्यं तु संलक्ष्ये समाधानमिति श्रुतम् ॥ १० ॥**

त्रिकांड नेमस्त वेदवचन । कर्म उपासना वैराग्य जाण । ज्ञानविज्ञान मुख्यत्वें ॥ ९९ ॥ परि हें गुरुकृपेवीण । न बाणे अनुभवखूण । सद्गुरु परमात्मा पूर्ण । बोधितां आपण अनुभव घडे ॥ १०० ॥ ह्मणऊनि निगमाचार्यवचन । जेथें ज्यासि विश्वास पूर्ण । तया नांव श्रद्धा जाण । श्रद्धाळू अनन्य भक्त तो ॥ १ ॥ महावाक्य सद्गुरुवचन । बोधिली निजात्मता पूर्ण । तेंचि अखंड अनुसंधान । सावधान निजनिष्ठा ॥ २ ॥ जया सद्गुरुकृपा आपण । तेणें करावें एकांतसेवन । गुणातीत अनुसंधान । + सावधान राखावें ॥ ३ ॥ जे जे मनीं कल्पना होय । पूर्णत्वें ठाव नुरवी तये । गुरुवाक्य सावधान स्वयें । वृत्ति तन्मय राखतु ॥ ४ ॥ कायेतें सम राखोन । संकल्प सांडूनिया मन । परें वाचेतें परतऊन । अनुसंधान पूर्णत्वीं ॥ ५ ॥ सांडोनि विपरीत चिंतन । आत्मलक्ष्यीं अभिन्न पूर्ण । ऐसें सावध अनुसंधान । समाधान सहजचि ॥६॥ या साधनीं साधनयुक्त । सद्गुरूचा अनन्यभक्त । त्यासिच ज्ञानसिद्ध्यर्थ । विचार सांगत आचार्य॥७॥

**उक्तसाधनयुक्तेन विचारः पुरुषेण हि ।**
**कर्तव्यो ज्ञानसिद्ध्यर्थमात्मनः शुभमिच्छता ॥ ११ ॥**

अनुक्रमें बोलिलीं साधनें । त्या त्या युक्ति सावधपणें । पुरुषें बरवा विचार करणें । तरीच पावणें ज्ञानसिद्धि ॥ ८ ॥ आपणा शुभ होय कल्याण । ऐसें इच्छी ज्याचें मन । तेणें तेथें सावधान । समाधान सुखसिद्धी ॥ ९ ॥ साधनयुक्त विचार न करी । गुरुचरणीं श्रद्धा न करी । शब्दज्ञान शिकला जऱ्ही । वाहवेल पुरीं मायेच्या ॥१०॥ गुणविकारें विकारवंत । हरीची माया दुस्तर बहुत । हरिकृपेवीण येथें । ज्ञान बोलत बुडालें ॥ ११ ॥ ह्मणऊनि अनन्य हरीतें शरण । स्वधर्में करी श्रीकृष्णस्मरण । तेणें संतुष्ट नारायण । वैराग्य जाण हृदयीं उपजे ॥ १२ ॥ विवेक शम दम उपरति । तितिक्षा मुमुक्षा होय पुरति । गुरुवाक्यें निष्ठा चित्तीं । पुरुषाप्रती समाधान ॥ १३ ॥ समाधान नाहीं अंतरीं । शब्दज्ञानें वक्तृत्व करी । अभिमानें फुगारा धरी । वाहावे पुरीं मायेच्या॥१४॥ह्मणऊनि सावधान सावधान ।

---

+ समाधान सहजचि ( पा. भे. )

स्वधर्में करावें हरिस्मरण । येणें पाविजे कल्याण । समाधान हरिकृपें ॥ ११५ ॥ हरिस्मरणें सावधान । साधनयुक्त होऊन पूर्ण । करावें विचारविवरण । बोलिले कृपेनें आचार्य ॥ ११६ ॥ शंकराचार्य कृपाघन । या विचाराचें लक्षण । पुढिले प्रकरणीं निरोपण । सांगेल कृपेनें अवधारा ॥ ११७ ॥ ये ग्रंथी नाहीं उधार । परिसे तो सभाग्य नर । रोकडी प्रचिति चमत्कार । ऐसा विचार अवधारा ॥ ११८ ॥ ह्मणे कृष्णदास जयराम । आवडी स्मरतां श्रीकृष्णनाम । अवघेंचि होय सुगम । कृपाळू परम गुरुनाथ ॥ ११९ ॥ इति श्रीअपरोक्षअनुभव । शंकरोक्ति सुखगौरव । साधनचतुष्टय सद्भाव । प्रकरण स्वयमेव प्रथम हें ॥ १२० ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॐनमोजी सद्गुरु स्वानंदघना । चिद्त्वें लोपूनियां गगना । ओळलासी परिपूर्णा । सुखजीवन कृपानिधि ॥ १ ॥ कडकडाडित वैराग्य गर्जत । तेणें वासनागर्भ गळत । धाकें वृत्ति उपरमित । श्रवणी ऐकत गर्जना ॥ २ ॥ ज्ञानविद्युल्लता तळपती । खुणा प्रतीति झळकति । गर्जनेसवें विजा पडति । जीवित्वाची स्थिति उरेना ॥ ३ ॥ विज पडतां अति दारुण । हृदयग्रंथी विदारून । सकळ संशय छेदून । अहंपण भस्म करी ॥ ४ ॥ मेघःश्याम सद्गुरु श्रीकृष्ण । वर्षे स्वानंदजीवन । बुद्धि धरणी निवोन । त्रयतापउष्ण पैं गेलें ॥ ५ ॥ शिष्यसुक्षेत्रीं जीवन वोळे । सोहंबीज विरूढलें । निजात्मफळ फळा आलें । पीक पिकलें सुखाचें ॥ ६ ॥ न वोळतां कृपाघन । कोरडी क्षेत्रें अवघीं जाण । साधनें जाती पवाळून । त्रयतापउष्ण शमेना ॥ ७ ॥ शिष्यक्षेत्रीं राबणूक झाली । सार्थकपणातें अवघीं आली । माउली गुरुमेघ ओळली । सुखें पिकली सुक्षेत्रीं ॥ ८ ॥ सद्गुरु मेघःश्याम श्रीकृष्ण । वोळला कृपाळू कृपाघन । पूर्णत्वें लोपुनि गगन । सुकाळ पूर्ण सुखाचा ॥ ९ ॥ तोचि शंकराचार्य गुरु । अपरोक्षज्ञानें उदारु । करावया दीनोद्धारु । आत्मसाक्षात्कार प्रकटीत ॥ १० ॥ प्रथम प्रकरणाचें निरोपण । स्वधर्म हरिनामस्मरण । येणें हरि सुप्रसन्न । तरीच आपण वैराग्य भासे ॥ ११ ॥ विवेक शम दम उपरति । तितिक्षा मुमुक्षा घडे पुरती । निगमाचार्यवचनीं प्रीति । एकाग्रचित्तीं समाधान ॥ १२ ॥ ऐशीं बोलिली साधनें । तद्युक्त होऊनि आपण । मुमुक्षु बरवा विचार करणें । तरीच पावणें ज्ञानसिद्धि ॥ १३ ॥ आणि हरिस्मरण साधनयुक्त । होऊनि विचारें जे न करित । तेही केले तितुके व्यर्थ । आचार्य ह्मणती परियेसा ॥ १४ ॥ साधनविचारेंवीण । निर्मळ नव्हे ज्ञानसाधन । जैसें हें पदार्थभान । प्रकाशेंवीण दिसेना ॥ १५ ॥ प्रकाशेवीण हे नयन ।

**नोत्पद्यते विना ज्ञानं विचारेणान्यसाधनैः ।**
**यथा पदार्थभानं हि प्रकाशेन विना क्वचित् ॥ १२ ॥**

जरी देखते पदार्थभान । तरीच साधनविचारेंवीण । होय ज्ञान

पुरुषार्तें ॥ १६ ॥ प्रकाशेवीण पदार्थ न दिसे । साधनविचारेवीण तैसे । ज्ञान पाविजे पुरुषें । भ्रांतिनाशा हें न घडे ॥ १७ ॥ जऱ्ही वेदशास्त्रसंपन्न । होऊनि करिताहे व्याख्यान । तऱ्ही भ्रांतीचें आठवण । न फिटे जाण पुरुषार्तें ॥ १८ ॥ क्षुधा जाय भोजनेवीण । तृषा जाय नसतां जीवन । साधनविचारेवीण । तरीच जाण ज्ञानसिद्धि ॥ १९ ॥ अमृत सेवितांची अमरपण । हरिभक्तीनेंचि प्रसन्न । तोवीं साधनाविचारेंकरून होय जाण ज्ञानसिद्धि ॥ २० ॥ ते अनुक्रमें दाविलीं साधनें । आतां विचार तो कायसा ह्मणणें । त्यासाचि सांगतों सुचिन्हें । आचार्य ह्मणे परियेसा ॥ २१ ॥

**कोऽहं कथमिदं जातं को वै कर्ताऽस्य विद्यते ।**
**उपादानं किमस्तीह विचारः सोऽयमीदृशः ॥ १३ ॥**

मी मी ह्मणे तो जो आपण । तोचि मी आहें कोण । कोठोनि हें जाहलें निर्माण । केसें मीपण देहत्व घडले ॥ २२ ॥ येथें कर्ता जाणिजे तो कोण । आणि माझें मूळ तें काय कारण । बरवें जाणावें आपण । विचार जाण तो ऐसा ॥ २३ ॥ तरी कैसा मीपणाचा उद्भव । आणि कैसा मीपणाप्रभाव । संकळित सांगिजेल भाव । धरणें स्वयमेव अवधान ॥ २४ ॥ सहजज्ञानमय आनंदमय । सदोदित शाश्वत निरामय । अनादि अनंत अप्रमेय । सिद्धचि स्वयें दुजेनवीण ॥ २५ ॥ तेथें माया ते विवर्त मिथ्याभूत । नसोनि भासे मृगजळवत । तयें तें सांख्य वेदांत । कृति ह्मणत विवर्तु ॥ २६ ॥ तिचेनि अविकारालागोन । नसोनि भासे पुरुषपण । जैसें निरालंब गगन । घटसंगें जाण घटाकाश ॥ २७ ॥ प्रकृति साभास स्फुरण । तेथें व्यापक सत्ताज्ञान । तया नांव मी (?) पण । सामर्थ्य सद्गुण ईश्वरत्वें ॥ २८ ॥ तयासंगें प्रकृति । सृष्टि इच्छा जाली धरिती । तया नांव महत्तत्व ह्मणती । सबळ शक्ति मीपणें ॥ २९ ॥ तोचि महदहंकारु । शक्तीसंगें त्रिप्रकारु । इच्छायुक्त सत्त्वाकारु । तोचि अहंकारु भासतु ॥ ३० ॥ क्रियायुक्त तोचि राजसु । द्रव्ययुक्त तो तामसु । भूतविषय द्रव्यांशु । होणें तयास पंचधा ॥ ३१ ॥ कारण कार्यातें व्यापीत । ह्मणऊनि कर्तृत्व उद्भवत । यापरी पंचभूत । जालें निर्मित तमोमय ॥ ३२ ॥ तेणेंचि अहंकारें रजोगुण । क्रियाशक्ति भूतीं धरणें । पंचप्राण दश करण । पंचधा होणें भूतांवरि ॥ ३३ ॥ सृष्ट्याकार इच्छाशक्ति । अहंता धरिली सत्त्वस्थिति । भोक्ता होऊनियां भूतीं । पांच शक्ति धरिलिया ॥ ३४ ॥ अंतःकरण ते शक्ति । त्रयें साधनें धरिती । समान श्रोत्रवाचा व्यक्ति । व्योमीं भोक्तीं शब्दातें ॥ ३५ ॥ वायोसि आदि शक्ति मन । राजसें व्यान त्वचा पाणी । भोक्तीं होऊनि आपण । स्पर्शालागूनि भोगित ॥ ३६ ॥ तेज बुद्धि ज्ञानशक्ति । राजसें त्रयें साधनें धरिती । उदान चक्षु पादगती । रूप भोक्तीं ते असे तेजीं ॥ ३७ ॥ इच्छाशक्ति चित्त जाण । राजस त्रयसाधनें घेऊन । अपान जिव्हा आणि शिश्न ।

आपीं रसज्ञ पै जाली॥ ३८॥अहंकार ते क्रियाशक्ती। राजस साधनें त्रय धरिती। प्राण प्राप्य गुद् हे स्थिति। गंधमोक्तीं धरणिये॥ ३९॥एवं हें पंचभूत। असें त्रिगुणेंसीं मिश्रित । या नांव पंचीकृत । सांख्यसिद्धांत बोलिला ॥४०॥ या पंचीकृत भूतांचे। हिरण्यगर्भ देह शिवाचे। देवतामय गुणांचे । वैकारिक साचे ह्मणिजे तया॥४१॥ तेथें तत्त्वें पंचवीस। ते हिरण्यगर्भाचे अंश । सूक्ष्म देह साभास । वैकारि तयांस ह्मणे सांख्य ॥ ४२ ॥ विष्णु चंद्र ब्रह्मा नारायण । रुद्र पंचक अंतःकरण । दिशा पवन सूर्य वरुण । अश्विनौ ज्ञानइंद्रियें हे ॥ ४३ ॥ अग्नि इंद्र उपेंद्र जाण । प्रजापति नैर्ऋति आपण । कर्मेंद्रियें जाणोन । कार्यज्ञान इंद्रियांचें ॥ ४४ ॥ पंचकीं अंतःकरणस्फुरण । तें ज्ञानइंद्रियें पंच प्राण । समान व्यान उदान । आपान प्राणपंचक ॥ ४५ ॥ कर्मेंद्रियीं क्रिया उत्पन्न । प्राणाचे जाहले उपप्राण । नाग कूर्म कृकुल जाण । देवदत्त पवन धनंजय ॥ ४६ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध । पंचभूतीं विषय प्रसिद्ध । अंतःकरणपंचक विविध । भोक्ते प्रसिद्ध सूक्ष्मरूपें ॥ ४७ ॥ एवं साभास विकार । हिरण्यगर्भ लिंगशरीर । परी जालेवीण साकार । न घडे व्यापारव्यक्ति विषयीं ॥ ४८ ॥ यालागीं साभास तें साकार । करितां जाहला सर्वेश्वर । भूतें विभागूनि शरीर । ब्रह्मांडाकार उभारी ॥ ४९ ॥ एकेक भूत द्विधा विभागुन । अर्ध स्वस्थानीं स्थापून । अर्ध चतुर्थ करून । वांटी आपण भूतांसी ॥ ५० ॥ एकभूतींचे चारी भाग। चौ भूतीं मिळून सांग । चहूंचे चारी विभाग। भूतीं आंग समरसें ॥ ५१ ॥ ऐसा कर्दम करून । व्यक्तीसि आणिले इंद्रियगण । साकार भूतें होऊन । जालीं गुणधर्म युक्त ॥ ५२ ॥ भूतीं शब्दादि गंधगुण । निश्चल चंचल आणि उष्ण । द्रवत्व आणि कठिण । धर्म जाण भूतांचे ॥ ५३ ॥ अवकाश वाहणें दाहणें । कर्मपिंडीं कारण धारण । कृष्ण हरित रक्त वर्ण । श्वेत पीत जाण । भूतांचे ॥ ५४ ॥ सदाशिव ईश्वर आपण। रुद्र विष्णु कमळासन । भूतीं आदिदैवतें पूर्ण । वर्तमान सदा असती ॥ ५५ ॥ कर्दमूनि भूतगुणमेळ । व्यक्तीस आणिला भूगोळ । स्वर्ग मृत्यु पाताळ । देह स्थूळ पुरुषाचे ॥ ५६ ॥ या भूगोळाचा विस्तार । सांगता वाढेल ग्रंथ फार । ह्मणऊनि संक्षिपाकार । सृष्ट्याकार दाविला ॥ ५७ ॥ याचे गर्भी फार । सुरनरपन्नगविस्तार । वृक्ष पर्वत नदिया सागर । जीवही अपार देहधारी ॥ ५८ ॥ हा भूगोळ जीवनांत । जीवन दहनांत । दहन असे पवनांत । पवन गगनांत नांदत ॥ ५९ ॥ अहंकारापोटीं गगन । महत्तत्त्वापोटीं अहंपण । एवं हें सप्तावरण । कार्य तें करणदशक अधिक ॥६०॥ ब्रह्मांडदेहीं अवस्था उत्पत्ति । अभिमानी ब्रह्मा अधिपती । अकारमातृका निश्चिती । साकारवती प्रणवाची ॥६१॥ हिरण्यगर्भ लिंगशरीर । स्थिति अवस्था पडिभार । विष्णु अभिमानी सुंदर । मात्रा उकार प्रणवाची ॥ ६२ ॥ महत्तत्त्व कारणशरीर । प्रळय अवस्था दुस्तर । तेथें अभि-

मानी रुद्र । मात्रा मकार प्रणवाची ॥ ६३ ॥ मूळप्रकृति महाकारण । अवस्थासाक्षित्व सर्वज्ञपण । तेथें ईश्वर अभिमान ॥ ॐकारपूर्ण अर्धमात्रा ॥ ६४ ॥ एवं हें अवघें मायामय । तम्र देहचतुष्टय । वस्तु नित्य निरामय । सहज अद्वय विकार ॥६५॥ आतां जीवत्वाचें लक्षण । कैसें प्रभवलें मीपण । किंचित संज्ञा सांगेन । प्रसार सांडूनि प्रमित ॥ ६६ प्रकृति पुरुषीं आपण । सृष्टीइच्छा अभिमान । तेथें जाहले त्रिगुण । सत्त्वाचे ज्ञान अज्ञान तमीं ॥ ६७ ॥ विषयाकार जाहलें ज्ञान । तुटलें मुळींचें अनुसंधान । तेणेंचि विरूढलें अज्ञान । प्रकृति भिन्नभिन्न जाहली ॥ ६८ ॥ भिन्नभिन्न प्रकृति वसे । भिन्नभिन्नपणें दिसे । भिन्न थिल्लरीं मिनले कैसे । भानु भासे भिन्नत्वें ॥ ६९ ॥ थिल्लरीं बिंब प्रकाशमान । तैसें अज्ञानीं जीवपण । ईश्वरदेहचतुष्टय जाण । ठसावे आपण जीवत्वी ॥ ७० ॥ हिरण्यगर्भी अधिष्ठात्रि देवते । तेचि इंद्रियें जाहलीं समस्तें । अवस्था अभिमानसहितें । जाहलीं व्यक्त त्वंपदीं॥७१॥ ब्रह्मांड स्थूळदेह शिवाचे । असे स्थूळ देह जीवांचे । उत्पत्तिद्वारा साचे । व्यक्त याचे पिंडरूपें॥७२॥षड्विकारी पिंड जाण। नांव याति रूप वर्ण। ऐसा प्रभवला अभिमान। देहत्व जाण भोक्तेपणें ॥७३॥ ऐसा मीपणाचा उभव । ऐसा मीपणाचा प्रभाव । कर्ता स्वयें सदाशिव । कारण स्वयमेव परमात्मा ॥ ७४ ॥ प्रकृतिपोटीं मीपण । विषयाकार जाहलें ज्ञान । तुटलें स्वरूपानुसंधान । भ्रम दारुण जन्ममृत्यु ॥ ७५ ॥ स्वधर्मे करी हरिचिंतन । तोचि तरे यापासून । साधनयुक्त होऊन । करी विचारण गुरुकृपें ॥ ७६ ॥ तो धरूनि ज्ञानविचारा । स्थूलींहूनि परते माघारा । निमग्न मुळीं बरा । आचार्य अवधारा सांगतु ॥ ७७ ॥ नव्हे

नाहं भूतगणो देहो नाहं चाक्षगणस्तथा ।

एतद्विलक्षणः कश्चिद्विचारः सोऽयमीदृशः ॥ १४ ॥

मीदेह भूतगुणाचे । पंच अंशिक एकएकाचे । अस्थि मांस त्वचा साचे । नाहीं रोमाचें जडपण ॥ ७८ ॥ लाळ मूत्र स्वेदयुक्त । शुक्र शोणित जळ द्रवत । क्षुधा तृषा निद्राहित । तेजहि भासत आलस्ययुक्त ॥७९॥ चळण वळण आकुंचन। प्रसरण धावन वायुगुण । काम क्रोध शोक मोहन । भय हे जाण गगनांश ॥ ८० ॥ एवं स्थूलदेह अवघे मिळोन । अवस्था जागृति विषयज्ञान । विश्व (?) राजस अभिमान । स्थूल भोगस्थान नेत्र तया ॥ ८१ ॥ क्रियाशक्ति रजोगुणाची । वाचा वैखरी तेथींची । अकारमात्रा प्रणवाची । मायिक साची मी नव्हे ॥ ८२ ॥ कल्पित देह दृश्यमान । जड अचेतन अज्ञान । नाम रूप याति वर्ण । उद्भव मरण जडातें ॥८३॥ मीदेह ह्मणे देहातें आपण । परी देह नेणे मजलागून । यालागीं देह दृश्यमान । द्रष्टा सज्ञान मी नव्हे ॥ ८४ ॥ चक्षुरादि इंद्रिय मन । जें सुखदुःख विराजमान । तेंही मी नव्हे आपण । दृश्यमान मज होय ॥ ८५ ॥ ज्ञातृसमान श्रोत्रद्वारें । शब्द

भोगी सुखदुःखभरें । वाचा वक्तृत्वें वावरे । मी तो खरें याअतीत ॥ ८६ ॥ मन व्यान सर्वांगीं त्वचेसी । भोगी चतुर्विध स्पर्शासी । पाणि इंद्रियक्रियेसी । मी तो सकळांसि साक्षिभूत ॥ ८७ ॥ बुद्धि उदान चक्षुद्वारें । रूप भोगी षड्विकार प्रकारें । पाद इंद्रियक्रिया विचरे । मी तो निर्धारें याअतीत ॥ ८८ ॥ चित्त अपान जिव्हा-मुखे । षड्रस भोगी यथासुखें । शिश्नीं त्यागक्रिया देखे । मी या ओळखें दृश्यत्वें ॥ ८९ ॥ अहं प्राण घ्राणद्वारीं । गंध भोगी परोपकारी । गुद मळविसर्जन करी । मी हें निर्धारीं नव्हे सकळ ॥ ९० ॥ हे लिंगदेह वासनात्मक । स्वप्नावस्था काल्पनिक । अभिमानी तैजसु एक । कल्पित देख भोग भोगी ॥ ९१ ॥ ये अवस्थेतें कंठस्थान । इच्छाशक्ति सत्त्वगुण । मध्यमा वाचा हें जाणोन । उकार आपण मात्रा हे ॥ ९२ ॥ एवं या देहद्वयातीतु । सुखदुःखानें अलिप्तु । कवण मी आहें साक्षिभूतु । जाणिजे निश्चित विचार ऐसा ॥ ९३ ॥ देहद्वयातें जाणतु । कवण मी आहें ज्ञानवंतु । ऐसें नेणिजे निश्चितु । अज्ञानमातु ह्मणऊनि ॥ ९४ ॥ तें अज्ञानकारण । प्रसवे देहद्वयालागून । त्याची सांगिजेल खूण । आचार्य सर्वज्ञ

**अज्ञानप्रभवं सर्वं ज्ञानेन प्रविलीयते ।**

**संकल्पो विविधः कर्ता विचारः सोऽयमीदृशः ॥ १५ ॥**

अवधारा ॥ ९५ ॥ हें देहद्वय आपण । प्रभवे अज्ञानापासून । आणि अज्ञानीच परतोन । दिनदिन लयोद्भव ॥ ९६ ॥ जे भूतस्वप्नाचे अंतीं । मनचक्षुरादिक लया जाती । आपुले स्वभाव विसरती । मागुती विरूढति तेथून ॥ ९७ ॥ देह हें ह्मणजे कारण । सुषुप्ति अवस्था स्तब्धपण । अभिमानी येथें प्राज्ञ । भोगूं जाणा निद्रानंद ॥ ९८ ॥ हृदयस्थान दिव्य शक्ति । तमोगुण वाचा पश्यंती । यकारमातृकास्थिति । प्रणवाकृति तिसरी ॥ ९९ ॥ एवं स्थूळ सूक्ष्म कारण । अवघें विरूढलें अज्ञान । ज्ञानें जाय निरसून । जैसें स्वप्न जागृतीं ॥ १०० ॥ अज्ञानपोटीं संकल्प वाढे । तेणें भेदाभेद विरूढे । प्रगटित निजज्ञान गाढे । यासु रोकडें करितसे ॥ १ ॥ रात्रीपोटीं अंधकारु । दाटला भासे अपारु । सूर्योदयीं धरी धीरु । हा निर्धारु घडेना ॥ २ ॥ देह अवस्था अभिमान । त्रिमात्रा विरूढले त्रिगुण । अवघेंचि मिथ्या दृश्यमान । विचारु जाण तो ऐसा ॥ ३ ॥

**एतयोर्यदुपादानमेकं सूक्ष्मं सदव्ययम् ।**

**यथैव मृद्घटादीनां विचारः सोऽयमीदृशः ॥ १६ ॥**

या अवघियांचें कारण । जैसें तरंगातें जीवन । एक वस्तुचि परिपूर्ण । सिद्ध आपण सदोदित ॥ ४ ॥ जे सूक्ष्माहूनि सूक्ष्म सानें । पूर्णाहूनि परिपूर्ण । शाश्वत अवि-नाश चिद्धन । सहज आपण सिद्धाचि ॥ ५ ॥ येथिंचा विवर्त दृश्यमान । एकीं

अनेक दिसे भान । घट मृत्तिका भिन्न भिन्न । नसोनि आपणां दिसत ॥ ६ ॥ घटापूर्वी मृत्तिका असे । घटाअंतीं तेचि ते असे । घट भासे अथवा नासे । लिप्त नसे मृत्तिका ॥ ७ ॥ मृत्तिकारूपें घटि दिसे । मृत्तिकेमाजी घट नसे । विवेकें जाणिजे ऐसें । विचार असे तो ऐसा ॥ ८ ॥ एवं निरसूनि देहत्रय । आपण जाणिजे निरामय । तुर्येतें राहोनि निःसंशय । विचार स्वयें तो ऐसा ॥ ९ ॥ मी तंव

अहमेकोऽपि सूक्ष्मश्च ज्ञाता साक्षी सदव्ययः ।
तदहं नात्र संदेहो विचारः सोऽयमीदृशः ॥ १७ ॥

एकत्वें परिपूर्ण । मजहूनि सूक्ष्म नाहीं आन । देह जड मूढ अज्ञान । साक्षी ज्ञानस्वरूप मी ॥ १० ॥ देहद्वयाचें दृष्टपण । ज्ञाता साक्षी मी जाण । मज तों येथें कोण्ही नेणें । मिथ्यापणें सकलही ॥ ११ ॥ ह्मणोनि सत्ता सदोदित । अविनाश मीच येथें । नव्हे मी दृश्य मिथ्याभूत । संदेह येथें असेना ॥ १२ ॥ स्थूल सूक्ष्म आणि कारण । देहत्रय मिथ्याभूतभान । मी तंव विदेह परिपूर्ण । विचार आपण तो ऐसा ॥ १३ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ती । माझेनि अवस्था प्रकाशती । मी तंव सत्तामात्र ज्ञप्ति । पूर्णस्थिति एकला ॥ १४ ॥ विश्व तैजस प्राज्ञ । हे अवस्थात्रय अभिमान । मी तंव वस्तु निरभिमान । ज्ञानघन पूर्णत्वें ॥ १५ ॥ स्थूळ प्रविक्त निद्रानंद । अभिमानी यांचे भोग विविध । नेत्र कंठ आणि हृद । स्थानें प्रसिद्ध अवस्थांचीं ॥ १६ ॥ मी तंव भोगभोक्तयातीत । स्थानमानातीत अनंत । पूर्णस्वानंद सदोदित । सिद्ध एकांत एकला ॥ १७ ॥ क्रिया इच्छा द्रव्य शक्ति । रजसत्त्वतमी वर्तती । माझी गुणातीत स्थिति । सिद्धप्रतीति माझी मज ॥ १८ ॥ वैखरी मध्यमा पश्यंतीस । जाणता अवच्य निराभास । अकार उकार मकारास । मात्रात्रयांस साक्षिभूत ॥ १९ ॥ एवं हे आत्मविचारण । देह महाकारण ज्ञान । तुर्याअवस्था साक्षित्वपण । प्रत्यक् चिंतन अभिमान ॥ २० ॥ आनंदावभास भोग जाण । देहाति मूर्ध्नि स्थान । ज्ञानशक्ति शुद्धसत्त्वगुण । परा आपण वाचा तेथें ॥ २१ ॥ हा अर्धमात्रा ॐकार । एकाकार ब्रह्माकार । नादातीत नादाकार । अखंड अपार ज्ञानमय ॥ २२ ॥ एवं देहत्रयातीत । मी एक तुर्या ज्ञानवंत । ज्ञाता साक्षी सदोदित । विचार करित तो ऐसा ॥ २३ ॥ जैसें हें त्वंपद मिथ्या जाण । तैसेंचि तत्पद ह्मणऊन । हें तव कार्यकारण । मायिक भान मिथ्यत्वें ॥ २४ ॥ पंचभूतांचें निर्माण । पिंड ब्रह्मांड अभिन्न । उत्पत्ति जागृति आपण । चतुरानन तोचि विश्व ॥ २५ ॥ हा उभय एकु साकार । प्रथम प्रणवाचा अकार । आणि हिरण्यगर्भाचा विस्तार । लिंगाकार सूक्ष्मत्वें ॥ २६ ॥ स्थिति तेचि होय स्वप्न । विष्णु तैजसु अभिन्न । एकचि हें कार्यकारण । उकार जाण द्वितीय मात्रें ॥ २७ ॥ महत्तत्त्व देहकारण । तेंचि जीवाचें अज्ञान । प्रकृत

सुषुप्ति अभिन्न । रुद्र प्राज्ञ अभिमानी ॥ २८ ॥ हा उभय मिळूनि किरु । प्रणवाचा त्रितीय मकारु । हा अकारु उकारु मकारु । सविस्तर सृष्टिरूपें ॥ २९ ॥ हा तंव विवर्त मिथ्याभूत । ज्ञाता साक्षी मी अनंत । अद्वय पूर्ण अखंडित । सिद्ध शाश्वत एकला ॥३०॥ ऐसें ज्ञानस्फुरण । मूळप्रकृति महाकारण । अवस्था तुर्या सर्वज्ञपण । मायिक जाण सर्वही ॥ ३१ ॥ त्वंपदीं महाकारण । तेथें प्रत्यगात्मा चैतन्य । तत्पदीं महाकारण । पूर्ण चैतन्य परमात्मा ॥ ३२ ॥ जें स्वयें प्रत्यक् चैतन्य । तें स्वयें पै चैतन्य । सहज शाश्वत अभिन्न । पूर्णत्वें पूर्ण संचलें ॥ ३३ ॥ जैसें घटमठत्यागें । गगन सहज निजांगें । उपाधिरहित स्वांगें । वस्तुचि अंगें अद्वय ॥ ३४ ॥ आत्मा परमात्मा अभिन्न ॥ ॐकाराक्षर ज्ञानघन । मायिक विवर्त मिथ्याभान । सिद्ध तें पूर्ण उपाधिरहित ॥ ३५ ॥ उपाधीस नाहीं सत्यपण । मी तेथें काय भिन्नाभिन्न । एक अनेक ह्मणे कोण । हेतुवीण पूर्णत्वीं ॥ ३६ ॥ ऐशी हे निजात्मस्थिति । जाणिजे गुरुकृपा प्रतीति । शंकराचार्य कृपामूर्ति । विचार ह्मणती तो ऐसा ॥ ३७ ॥ ऐसें नाहीं विचारण । नेणें आपली निजात्मखूण । या नांव बोलिजे अज्ञान । सांगेल सर्वज्ञ आचार्य ॥ ३८ ॥ स्वधर्म हरिनामस्मरण । येणें वोळगती साधनें । साधनयुक्त विचारण । सिद्धचि होणें स्वानंद ॥ ३९ ॥ ह्मणे कृष्णदास जयराम । माझें जीवन श्रीकृष्णनाम । येणें अवघेंचि सुगम । कृपाळू परम गुरुनाथ ॥ ४० ॥ इति श्रीअपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुखगौरव । आत्मविचार सद्भाव । प्रकरण स्वयमेव दुसरें ॥ १४१ ॥ ॥ २ ॥

॥ ॐनमो सद्गुरु ज्ञानमया । चिदाकाशसूर्या । स्वप्रकाशनिर्मया । सुखालया स्वतःसिद्ध ॥ १ ॥ उदय अस्त नाहीं चळण । ज्ञानपूर्णत्वें परिपूर्ण । घनानंदतु आपण । सहज चिद्धन सुखमय ॥ २ ॥ तुझिया कृपाउदयावीण । अज्ञानरात्रीमाजी जन । अंध जाले ज्ञाननयन । अधःपतन नोळखती ॥ ३ ॥ मर्यादेवीण अंधकारु । निबिड दाटला दुर्धरु। त्यांत कामादिक तस्करु। लहान थोर नागविती ॥ ४॥ निद्रा लागे भ्रमें दारुण । त्यामाजी साच भाव स्वप्न । मीदेह आणि हे जन । विषयाचरण आवडे ॥ ५ ॥ मी एक आहें देहधारी । कन्याकुमार माझीं खरीं । व्यवसाव शिश्नोदरीं । तृष्णा धरी अहंते॥६॥आणि विपरीत ज्ञान अमुप। घरोघरीं लागले दीप । विषयसाधनानुरूप । खटाटोप जाणीव ॥७॥ भोगूं म्हणती विषयसुख । तंव अपार वाढे दुःख । पाप पुण्य स्वर्ग नरक । अघोर देखा नुल्लंघवे ॥ ८ ॥ सद्गुरु चित्सूर्या तुजवीण । फार दुर्दशा गणी कोण । याचें न करावें कथन । असो दारुण दुःखरूप॥९॥ सद्गुरु चित्सूर्यनारायणा । तुझी कृपाउदय पूर्णा । ठाव नुरे भवस्वप्ना । साचपणा

भक्त येती ॥ १० ॥ निजदृष्टि ज्ञानें उघडली । अज्ञाननिशी विसरोनि गेली । सृष्टि स्वप्रकाशें भरली । अंधकारभुली उरेना ॥ ११ ॥ चालली अद्वय साधनें । मुमुक्षी स्वानंदभोजन । संवादती अनुभवखुण । अभेद भजनें क्रीडती ॥ १२ ॥ स्वधर्मस्थितीचा व्यापार । बरवा हरिभजनीं आदर । वैराग्य निजज्ञान निर्धार । सुखसंभार सदैवा ॥ १३ ॥ सद्गुरु निजज्ञानभास्करा । तुझा प्रकाश अपरापरा । ठाव नुरवी धरा अंबरा । निर्विकारा तूंचि तूं ॥ १४ ॥ तूं ह्मणावयापुरता । मीपणासि ठाव जरी असता । तरी मी तूं हें वदतां । ठाव होता शब्दासी ॥ १५ ॥ सूर्याच्या ठायीं रात्रि लेशु । नसता कोण ह्मणे प्रकाशु । स्वप्रकाशातें प्रकाशु । ऐसा भासु उपजला नसे॥१६॥ उदयो अस्तुवीण पूर्ण । सिद्ध स्वप्रकाश चिद्गगन । दिवसनिशी उभयमान । नसे आपण तूंचि तूं ॥ १७ ॥ सूर्य आत्मा म्हणे श्रुती । गुरुरूपें आत्मप्रतीति । अद्वय अनंत पूर्णस्थिति । सिद्धि आयति सहजचि ॥ १८ ॥ ऐशी सिद्ध आत्मस्थिति । नेणोनि देहात्मता मानिती । तो भ्रम मिथ्या भ्रांति । पूर्ण म्हणती परिच्छिन्न॥ १९ ॥ कोण्ही एका भवंडी असे । नगर डोंगर भोंवतां दिसे । तें भोंवडीचें कार्य जैसें । विपरीत तैसें अज्ञान ॥ २० ॥ तें विपरीत अज्ञान ॥ त्याचें कैसें असे चिन्ह । शंकराचार्य रूपाघन । सांगे रूपेनें श्लोकार्थ ॥ २१ ॥ आत्मा तंव निष्कळ

**आत्मा विनिष्कलो ह्येको देहो बहुभिरावृतः ।**
**तयोरैक्यं प्रपश्यन्ति किमज्ञानमतःपरम् ॥ १८ ॥**

आपण । एकला एक परिपूर्ण । एक म्हणतवया म्हणतें कोण । एकत्वेंवीण एकला ॥ २२ ॥ आणि पंचभूतांच्या पंचवीस कळा । बहुत मिळोनि वळिला गोळा । विकार ऊर्मि यातें प्रबळा । देह सगळा बहुतांचा ॥ २३ ॥ देह असोनि परिच्छिन्न । आत्मा असोनि परिपूर्ण । त्या तें देहत्वचि पाहोन। देह मी आपण म्हणे जो ॥ २४ ॥ याति वर्ण धर्म गुण । नाम रूप देहाभिमान । हे मीच म्हणे जो आपण । अज्ञान कोण त्यापरता ॥ २५ ॥ देह नेम्य एकदेशी । नेमूं नेणे आपणासि । काण्हा

**आत्मा नियमको ह्यन्तर्देहो बाह्यनियाम्यकः ।**
**तयोरैक्यं प्रपश्यन्ति किमज्ञानमतः परं ॥ १९ ॥**

बधिर आकृतीसि । देह देहासि नेमुक नव्हे ॥ २६ ॥ या देहातें माझा ह्मणे । काळे गोरे बधिर काणे । ऐसा नेमकु आपण । जाणपणें अंतरात्मा ॥ २७ ॥ आत्मा नियमकु अंतरीं । देह हे नियम्य बाहेरी । लेणार जाणे वस्त्राचीपरी । वर्खे तरी तो नव्हे ॥ २८ ॥ ऐसें नेणोनि आत्मयासि । एकत्वें पाहे एकदेशी । देहत्वभावीं आत्मयासी । याहूनि कोणासि अज्ञानत्व ॥ २९ ॥ आत्मा ज्ञानमय आपण ।

**आत्मा ज्ञानमयः पुण्यो देहो मांसमयोऽशुचिः ।**
**तयोरैक्यं प्रपश्यन्ति किमज्ञानमतः परं ॥ २० ॥**

जैसें कां निर्मळ पुण्य । परम पवित्र ज्ञानगगन । अलिप्त पूर्ण नांदत ॥ ३० ॥ देह अस्थिचर्ममांस । परम अशुचि सदोष । पापचि म्हणिजे पुण्यास । तरीच आत्मयास देहत्व ॥ ३१ ॥ ऐसें न घडतें आपण । तयासि एकत्वें अवलोकून । धरोनि बैसे अभिमान । अज्ञान कोण त्यापरता ॥ ३२ ॥ आत्मा स्वप्रकाशें प्रकाशघन

**आत्मा प्रकाशकः स्वस्थो देहस्तामस उच्यते ।**
**तयोरैक्यं प्रपश्यन्ति किमज्ञानमतः परं ॥ २१ ॥**

स्वस्थिति सत्तारूप आपण । आत्म्यातें प्रकाशावया जाण । दुजें आणि न असेना ॥ ३३ ॥ देह तो तामस अज्ञान । जडमूढत्वाचे अचेतन । त्यातें स्वतां नाहीं चळण । प्रकाशे आपण आत्मसत्ते ॥ ३४ ॥ ऐसें असोनि पाहें । आत्म्यातें ह्मणती देहें । अंधातें अंधकारचि आहे । अज्ञान काय त्यापरतें ॥ ३५ ॥ आत्मा सत्य

**आत्मा नित्यो हि सद्रूपो देहोऽनित्यो ह्यसन्मयः ।**
**तयोरैक्यं प्रपश्यन्ति किमज्ञानमतः परं ॥ २२ ॥**

नित्य शाश्वत । अविनाश अमुप अनंत । सत्तापूर्ण सदोदित । सिद्ध अद्वैत एकला ॥ ३६ ॥ देह अनित्य अशाश्वत । नाशिवंत एकदेशी असत्य । तयातें एकत्वें पाहत । आत्मत्व मानीत देहातें ॥ ३७ ॥ सत्यातें असत्य भाऊन । ह्मणे जन्मा येईल मरण । नांवरूपाचें मपिण । अज्ञान कोण तयापरता ॥ ३८ ॥ देह जड अप्रकाश । आत्मा चिदानंद प्रकाश । देहाच्या ठायीं जन्मनाश । आत्मा अविनाश परिपूर्ण ॥ ३९ ॥

**आत्मनः स्वप्रकाशत्वं यत्पदार्थविभासनं ।**
**नाग्न्यादिदीप्तिवद्दीप्तिर्भवत्यन्धो यथा निशि ॥ २३ ॥**

आत्म्याचें तत्त्वता प्रकाशत्व । स्वयें आपण मात्र असत । चिदानंद सदोदित । सिद्ध अद्वैत पूर्णघन ॥ ४० ॥ जया प्रकाशावया दुजें ज्ञान । उपजलें नाहीं सर्वथा जाण । अथवा आत्म्यानें प्रकाशावया आन । तरी द्वैतभान असेना ॥ ४१ ॥ आत्मा आपणातें प्रकाशी । तरी अज्ञान जन्मलें नाहीं त्यासी । अज्ञान नसतां ज्यासी । होणें कासयासी लागेल ॥ ४२ ॥ ह्मणऊनि चिदानंद आत्माराम । आपणमात्र चिद्व्योम । स्वप्रकाश पूर्णशम । परब्रह्म परमात्मा ॥ ४३ ॥ आपण मात्र स्वप्रकाश । अन्यथा होणें नाहीं त्यास । हा अनुभव अनुभवियास । अज्ञान ज्ञातेपणास विसरोनि ॥ ४४ ॥ सूर्य चंद्र अग्नि आदि दीप्ति । स्वप्रकाशवंत लौकिकीं दिसती । परी ऐशी नव्हे आत्मस्थिति । क्षणिका भासती दृश्यत्वें ॥ ४५ ॥ या दीप्ति आहेत चंचळा । निरंतर ही निश्चळा । गोचर इंद्रियां दृश्यकळा । आत्मा केवळ हे

नव्हती ॥ ४६ ॥ यदर्थी भगवद्गीता प्रमाण । जें सकळ शास्त्रांचें सारमथन । ऐशाच वेदांतिश्रुति जाण । बाह्या उभारूनि गर्जति ॥ ४७ ॥ ह्मणोनियां दृश्य दीप्ति ।

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।**
**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २४ ॥**

यांसारिखी नव्हे आत्मस्थिति । आत्मा सिद्ध स्वयंज्योति । स्वानंदु संविति पूर्णघनु ॥ ४८ ॥ दृश्य या अग्न्यादि दीप्ति । यांसि अंधत्व येतसे राती । क्षण एका भासती लोपती । आत्मस्थिति ऐशी नव्हे ॥ ४९ ॥ आत्मा निरंतर स्वप्रकाश । नेणोनि ऐशिया आत्मयास । पुढती देहत्वें पाहती त्यास । धिक्कारी तयांस

**देहोऽहमित्ययं मूढो धृत्वा तिष्ठत्यहो जनः ।**
**ममायमित्यपि ज्ञात्वा घटद्रष्टेव सर्वदा ॥ २५ ॥**

शंकरु ॥ ५० ॥ धरूनि बैसले मूढ जन । श्रीशंकराचार्य कृपेंकरून । करी सावधान तयांतें ॥ ५१ ॥ देह नेणे देहपणासि । अथवा नेणे ज्याचें त्यासी । देहातें माझें ऐसें ह्मणसी । तो तूं असती जाणता ॥ ५२ ॥ माझे देह मी आपण । ऐसें तुजाचि आहे ज्ञान । देह नेणे तुजलागून । ज्ञाता जाण तूं याचा ॥ ५३ ॥ घटाचा देखणा डोळा । तो तंव घटपणा वेगळा । तूं देहातीत केवळा । ज्ञानलीला पूर्णत्वें ॥ ५४ ॥ एवं देहा येव्हडेपण । सांडी हें मिथ्या अज्ञान । देहातीत पूर्णपण । नांदे आपण परमात्मा ॥ ५५ ॥ स्थूल सूक्ष्म देह जाण । साकारसा भासेल पूर्ण । उभयअंगें देहपण । अज्ञान कारण ययाचें ॥ ५६ ॥ अज्ञानाच्या पोटीं पाहें । मन इंद्रियें नांदती देहें । स्वप्न पोटीं जें जें पाहे । तें तें कार्य स्वप्नाचें ॥ ५७ ॥ पूर्वेचा सूर्य उत्तरे दिसे । तें भ्रमाचें कार्य कीं असे । मृगजळ जळचि असे । भ्रमभ्रमें भासे मृगातें ॥ ५८ ॥ बाळका बागुल सत्य दिसे । सज्ञानातें जन्मला नसे । तेविं अज्ञाना भ्रांति वसे । देहीं असे अभिमान ॥ ५९ ॥ एवं अज्ञान मिथ्या देह । मी तंव असें स्वानंदमय । ऐसें जाणोनि संदेह । ज्ञानिये पाहें ज्ञान तें ह्मणती ॥ ६० ॥ या ज्ञानाचें लक्षण । श्रीशंकराचार्य सर्वज्ञ । विषद सांगे निरोपण । सावधान भक्तजनीं ॥ ६१ ॥ ब्रह्म मी निःसीमशीम । मजमाजीं नाहीं आनु विषम । माझ्या

**ब्रह्मैवाहं समः शान्तः सच्चिदानन्दलक्षणः ।**
**नाहं देहो ह्यसद्रूपो ज्ञानमित्युच्यते बुधैः ॥ २६ ॥**

पूर्णता नाहीं सीम । सम ब्रह्म शांत मी ॥ ६२ ॥ विषम तरंग मिथ्याभान । जळ जळत्वें समसमान । हाही दृष्टांत दिसे सान । सम मी पूर्ण परब्रह्म ॥ ६३ ॥ पूर्ण निश्चळ निजशांत । सहज स्वानंद अनंत । आदि मध्य नाहीं अंत । सदोदित शांतरूप ॥ ६४ ॥ शून्यत्व सांडुनि गगन । पूर्ण निश्चळ समान । अखंड निर्मळ

आपण । ज्ञानघन पूर्णत्वें ॥ ६५ ॥ सत् मी सत्य सदोदित । शाश्वत निज अखंडित । मी ज्ञानमय अनंत । अप्रतिम चिदत्वें ॥ ६६ ॥ स्वानंदमय सहजस्थित । मी अद्वयानंद अनंत । मी परमानंद अप्रमित । सिद्ध सतत परिपूर्ण ॥ ६७ ॥ एवं सच्चिदानंदलक्षण । माझें स्वतःसिद्ध आपण । त्रिपुटीरहित अभिन्न । अद्वय पूर्ण एकला ॥ ६८ ॥ एकला पूर्ण मी आपण । देह मी नव्हें परिच्छिन्न । असद्रूप मिथ्या भान । नव्हे चिन्ह एकदेशी ॥ ६९ ॥ ऐसें जाणणें या नांव ज्ञान । बोलती ज्ञानिये प्रबुद्ध जन । आचार्य ह्मणे सावधान । निर्विकारपण स्वतःसिद्ध ॥ ७० ॥ देह गुणाचें विकारवंत । मी निर्विकार गुणातीत । पूर्णत्वें पूर्ण अनंत । देह कुश्चित मी नव्हें ॥ ७१ ॥

**निर्विकारो निराकारो निरवद्योऽहमव्ययः ।**
**नाहं देहो ह्यसद्रूपो ज्ञानमित्युच्यते बुधैः ॥ २७ ॥**

मायिक गुणांचे गुणविकार । त्रिगुणीं भासती त्रिप्रकार । लेखा करितां असती फार । अंधकार केवि गणवे ॥ ७२ ॥ मी या गुणांतीत निर्विकार । माझिया स्वरूपासि नाहीं पार । मी निर्गुण निर्विकार । नाहीं पारावार पूर्णत्वीं ॥ ७३ ॥ भूत गुणांचे सविकार । पिंड ब्रह्मांड आकार । नासे भासे दृश्याकार । गंधर्वनगर जयापरी ॥ ७४ ॥ मी निर्गुण निराकारु । अमायिक परमेश्वरु । मजमाजी हा आकारु । भासे जैसा रजताकारु शिंपीचा ॥ ७५ ॥ मी शुद्ध बुद्ध निर्विकार । निराकार अमर अजर । माझ्या स्वरूपासि नाहीं पार । पूर्ण अपार अद्वय ॥ ७६ ॥ मी आत्मा ब्रह्म पूर्ण । देह मिथ्या परिच्छिन्न । या नांव बोलिजे ज्ञान। प्रबुद्ध जन सज्ञानी ॥ ७७ ॥

**निरामयो निराभासो निर्विकल्पोऽहमव्ययः ।**
**नाहं देहो ह्यसद्रूपो ज्ञानमित्युच्यते बुधैः ॥ २८ ॥**

मी निरामय निराभास। निर्विकल्प मी परेश। देह नव्हे मिथ्याभास। प्रबुद्ध यास ज्ञान ह्मणती॥ ७८ ॥सिद्ध निरामय निरुपम।मज तों नाहीं विषयकाम।सुखस्वरूप आत्माराम।वासनाभ्रम मज नाहीं ॥ ७९ ॥ साकार साभास नाहीं मज । मी निराभास सिद्ध सहज । माझें म्यांच जाणिजे गुज । परम निज मीच मी ॥ ८० ॥ मज नाहीं कल्पनाभाव । निर्विकल्प मी परिपूर्ण । मज कल्पावया दुजें कोण । मी आपण कल्पूं कवणा ॥ ८१ ॥ मी तत्वतां आत्मा पूर्ण । देह मी नव्हें मिथ्याचिन्ह । साभास कल्पित परिच्छिन्न । मिथ्या जाण अमंगळ ॥ ८२ ॥ मी शाश्वत अनंत । नव्हें मी देह नाशिवंत । ऐसें जाणणें ज्ञान ह्मणत । प्रबुद्ध महंत ज्ञानिये ॥ ८३ ॥ मायिक

**निर्गुणो निष्क्रियो नित्यो नित्यमुक्तोऽहमच्युतः ।**
**नाहं देहो ह्यसद्रूपो ज्ञानमित्युच्यते बुधैः ॥ २९ ॥**

त्रिगुणी मिथ्याभान । भासे नासे मिथ्याचिन्ह । मी गुणातीत निर्गुण । अविकार पूर्ण ब्रह्ममय ॥ ८४ ॥ कार्य कारण कर्तृत्व क्रिया । भास हा भूतमया । हें तों नाहीं अप्रमेया । मज अक्रिया गुणातीता ॥ ८५ ॥ मजमाजी नाहीं अनित्य । नित्य मीच शाश्वत । मुक्तता मानिती भ्रांत । नित्यमुक्त असोनि मी ॥ ८६ ॥ मुक्तता मानिती ते चेवती । तयां सत्य देहभ्रांति । मी तंव अच्युत सहजस्थिति । सिद्ध प्रतीति माझी मज ॥ ८७ ॥ मी परमात्मा अच्युत । नव्हे मी देह नाशिवंत । या नांव ज्ञान ह्मणत । प्रबुद्ध महंत ज्ञानिये ॥ ८८ ॥ अणु माया कार्मिक जाण ।

**निर्मलो निश्चलोऽनंतः शुद्धोऽहमजरोऽमरः ।**

**नाहं देहो ह्यसद्रूपो ज्ञानमित्युच्यते बुधैः ॥ ३७ ॥**

मळे देहत्रय मळीण । अणु मळ तो कारण । कल्पना गहन मायिक मळ ॥ ८९ ॥ स्थूळक्रिया तो कार्मिक मळ । येणें त्रिविध जग समळ । हें तों मिथ्या मृगजळ । परम निर्मळ मीवस्तु ॥ ९० ॥ चंचळत्वें हेलावे मृगजळ । परी ते लटिकेचि पाल्हाळ । प्रकाश पूर्णत्वें अचचळ । नांदे निश्चळ कोंदला ॥ ९१ ॥ देह मिथ्या चळतां दिसे । सत्तामात्र मी अचंचळ असे । निर्मळ निश्चळ गगन जैसें । तैसा असे शून्य नव्हें ॥ ९२ ॥ गगन जैसे अमळ अढळ । आत्मा पूर्ण निर्मळ निश्चळ । गगन शून्य अंतराळ । आत्मा बहळ ज्ञानमय ॥ ९३ ॥ गगन शून्य मिथ्या भास । आत्मा घनत्वें चिदाकाश । आत्मत्वीं शून्यत्वाचा लेश । नाही स्पर्श सूर्यतमा ॥ ९४ ॥ गगन शून्य मिथ्याभूत । मी ज्ञानघन अनंत । माझिया स्वरूपासि नाहीं अंत । सदोदित संचला ॥ ९५ ॥ देह अशुद्ध असत् मळीण । शुद्ध बुद्ध मी ज्ञानघन । देह हें अशुचि भान । नातळे पूर्ण आह्मांसि ॥ ९६ ॥ बाळ तारुण्य ह्मातारपण । देहातें दिसे जरामरण । अजरामर मी पूर्ण । ज्ञानघन अनंतु ॥ ९७ ॥ एवं नव्हें देह नाशिवत । सिद्ध अविनाश मी अनंत । या नांव ज्ञान ह्मणत । प्रबुद्ध महंत ज्ञानिये ॥ ९८ ॥ एवं मिथ्यत्वा नांव अज्ञान । आणि सत्यत्वा नांव ज्ञान । अज्ञानरूप देहाभिमान । ज्ञानरूप पूर्ण आत्मा मी ॥ ९९ ॥ सत्य तें नव्हे असत्य । आणि असत्य तें नव्हे सत्य । जरी सत्य तें असत्य । तरी मिथ्या होतें ना ॥ १०० ॥ नाहींपण जें भासे । भासतांही मिथ्या असे । मृगजळ दिसे जैसें । परी नसे जळलेशु ॥ १ ॥ तेंवि अज्ञानें देहाचा संभव । अज्ञानें देहाचा उद्भव । अज्ञानें देहाचा प्रभव । मरणासि ठाव अज्ञानें ॥ २ ॥ पाप पुण्य सुख दुःख । अज्ञानें स्वर्ग आणि नरक । बंध मोक्ष सकलिक । भासे मायिक अज्ञानें ॥ ३ ॥ अज्ञान निरसावया जाण । वेदशास्त्रीं जाहले सज्ञान । बहुत बोलकें शब्दज्ञान । तरी अज्ञान निरसेना ॥ ४ ॥ रात्रीमाजी बळिये ह्मणती । अंधार उपसूं हातोपातीं । जितुकी

आंगवण तितुकी भ्रांति । उदयो गभस्ति जंव नाहीं ॥ ५ ॥ बागुल मारूं ह्मणोन । बाळकीं मांडिली आंगवण । बागुलभयाचें भान । लागे जाण पदोपदीं ॥ ६ ॥ महर्षि ब्रह्मा हरि हर । यांतेंही जे महादुस्तर । वरकड बापुडीं किंकर । माया दुस्तर केविं तरती ॥ ७ ॥ जें जें मांडिजे साधन । तेथें तेथें उपजे अभिमान । अनेक नाडिले सज्ञान । तपस्वी जाण नागविले ॥ ८ ॥ येथें श्रीकृष्ण कृपा करी । तोचि तरे मायापुरीं । येऱ्हविं जो जो आंगवण धरी । तो तो पुरीं वाहवतु॥ ९॥ लाघवियाचें लाघव जाण।लटकें दावी सत्यप्रमाण।जाणते पाहती निरखुन। परि तें भान कळेना॥१०॥ तोचि लाघवी काढी भ्रांति । तेव्हांचि साच घडे प्रतीति । येऱ्हविं बहुत जन भ्रमती । परी ते गुंता कळेना ॥ ११ ॥ तैसा देवो अनादि लाघवी । त्याचें लाघव मायादेवी । भगवत्कृपेनें तरावी । श्रीकृष्णदेवीं बोलिलें ॥ १२ ॥

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ ३१ ॥**

दैवीगुण मायिक माझी माया । अतिदुस्तर तरावया । मज शरण धनंजया । माझी माया ते तरती ॥ १३ ॥ यालागीं सावधान । आवडी श्रीकृष्णातें शरण । प्रेमप्रीती करावें भजन । सांडूनि अभिमान दीनत्वें ॥ १४ ॥ स्वधर्में करावें हरिस्मरण । करुणा भाकावी दीनवदन । देव द्विज गुरु प्राज्ञ । वंदावे सज्जन हरिरूपें ॥ १५ ॥ परम उत्कंठा धरूनि मनीं । अखंड सावध हरिचिंतनीं । प्रवर्तावें भक्तिसाधनीं । कृपेंकरूनि संताचिया ॥ १६ ॥ संसारींचें भ्रमरूप सुख । ऐसें मानावें जैसें विख । श्रीकृष्णाचें अनन्य रंक । प्रीतिपूर्वक करी भजन ॥ १७ ॥ तया प्रेमळालागून । श्रीकृष्ण होय सुप्रसन्न । श्रीगुरुकृपें आपण । वैराग्य जाण विवेकशुद्ध ॥ १८ ॥ शम दम तितिक्षा उपरति। अद्वैतश्रद्धा तयाप्रति। निगमाचार्यवचनीं प्रीति। सुखप्राप्ति गुरु-कृपें ॥१९॥ साधनयुक्त विचार करून।निरसूनि गेलें भ्रांतिभान।पूर्ण उदयो जाहलें ज्ञान। समाधान पूर्णस्थिति ॥ २० ॥ जैसें जाहलिया सावधान । निद्रा घूर्मि नाहीं स्वप्न । स्वप्नींचें सुखदुःखभान । जागृतीलागून स्पर्शेना ॥ २१ ॥ जागृतपणा आला रावो । स्वप्नदरिद्र झालें वावो । स्वराज्याचा अनुभव । जाहला परी वावो जालेपणा ॥ २२ ॥ अज्ञानें स्वरूप नेलें । आणि ज्ञानें आणूनि दिधलें । हें तों बोलणें खुंटलें । सिद्ध संचलें परब्रह्म ॥ २३ ॥ अज्ञान सत्य असावें । मा ज्ञानें तया मारावें । सूर्य शुद्ध करावें । तम सारावें हें न घडे ॥ २४ ॥ आधींच मिथ्या होऊनि गेलें । सूर्य तमा नाहीं स्पर्शलें । सूर्यें तमा नाहीं देखिलें । सूर्यत्व संचलें सूर्यत्वें ॥ २५ ॥ सिद्धचि स्वरूप आपण । कैंचें अज्ञान ज्ञातेपण । सहज ज्ञानानंदघन । ह्मणे आन असेना ॥ २६ ॥ आधीं दृश्य एक असावें । मग द्रष्टा हें ह्मणावें । अज्ञाना सत्यत्व

यावें । तरी ज्ञान होवें ज्ञातेपणें ॥ २७ ॥ सिद्ध सहज दुजेवीण । एक एक ह्मणे कोण । तूं वेगळें मीपण । घडे कैसें ॥ २८ ॥ आपणा जाणणें आपण । तरी मुळींच नाहीं नेणपण । मा तेथें जाणपण । आपणा आपण काय कीजे ॥ २९ ॥ दुसरे जाणावें आपण । तै येईल जाणपण । हें तों नाहीं मुळींहून । ज्ञानाभिमान कोण धरी ॥ ३० ॥ दुसरें नाहींच जेथें । मा काय जाणावें तेथें । जाणावें आपआपणियातें । तरी नेणतें असे ना ॥ ३१ ॥ गुळा गुळत्वें आपण । नाहीं देखिलें कडूपण । काय यावें गोडपण । सिद्धचि पूर्ण गोडपणें ॥ ३२ ॥ प्रकाशा होवें प्रकाशपण । कीं अमृता यावें अमृतपण । नादें करावें श्रवण । शीतळपण शिता यावें ॥ ३३ ॥ तैसें सत्य ज्ञानानंदघन । त्यासि काय यावें ज्ञातेपण । ज्ञानमय परिपूर्ण । ज्ञान अज्ञान ह्मणणें नसे ॥ ३४ ॥ ऐशी पूर्ण ज्ञानस्थिति । गुरुरूपें ज्ञानियाप्रति । श्रीकृष्णा शरण परम प्रीती ॥ तया प्राप्ति सिद्धचि ॥ ३५ ॥ जयराम श्रीकृष्णा शरण । कृष्णकृपा निजज्ञान । तेथें कैंचें ज्ञानाज्ञान । सिद्धचि पूर्ण संचलें ॥ ३६ ॥ आतां पुढील प्रकरण । आत्मा देहातीत ज्ञानघन । शंकराचार्य सर्वज्ञ । आशंका घेऊनि दावील ॥ ३७ ॥ इति श्रीअपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुख गौरव । अज्ञाननिवृत्ति ज्ञानानुभव । प्रकरण स्वयमेव तिसरें ॥ १३८ ॥

ॐनमो श्रीसद्गुरु शांता । स्वानंदमया परमामृता । अमरा अमृतजीवनता । साधुसंतां तूं जीवन ॥ १ ॥ अमृत सेविती ते देव । अमृतें मरणा नुरे ठाव । अमृतसुखाचा जनुभव । भोगिती निगर्व संतजन ॥ २ ॥ जयां अमृतत्वें निजयोग । तयांसि कैंचा भवरोग । अमृत स्वानंद [1]सभाग्य । निज निजांगें परमामृत ॥ ३ ॥ भक्ता अमृतीं पडे मिठी । अभक्तातें न घडे भेटी । जन्ममरणाचिया कोटी । भ्रांति संपुटीं भोगिती ॥ ४ ॥ अमृत सेविती त्यां अमरपण । स्वयें अमृताचि ते आपण । अमृतरूप त्यांचें वचन । मुमुक्षुजन निवताति ॥ ५ ॥ तो अमृताचि मूर्तिमंत । त्याचे मुखींचें कथामृत । भवरोगिया आरोग्य करित । स्वप्रतीति स्वयें नांदे ॥ ६ ॥ अमृतमय संतजन । निष्कळंक चंद्रमा त्यांचें मन । अज्ञान ज्ञानाभिमान । तम उष्ण असेना ॥ ७ ॥ सुखस्वरूप प्रकाश । पूर्ण शांत चिदाकाश ! आन नाहीं अवकाश । पूर्णत्वासि पार नसे ॥ ८ ॥ अमृतमय किरणकोटी । सुखें कोंदली सकळ सृष्टि । सद्भाव चकोरा भेटी । अमृतवृष्टि सर्वदां ॥ ९ ॥ चंद्रकिरण अमृतमय । परी वायसा प्रतीति नये । चकोर सर्वदा सुखमय । संत तन्मय रामचंद्रीं ॥ १० ॥ संत शांत निरभिमान । रामचंद्र त्यांचें मन । वोळला परमामृतघन । अभेद भजन तया-

१ संभोग ( क ).

वरि ॥ ११ ॥ भक्त देव अमृतसेवनी । अभक्त असुर मद्यपानी । मोहिनी मायन म-होनी । [1]देहाभिमानी उन्मत्त॥१२॥ शब्दज्ञानें भरला ताठा । चुकले भक्तीचा दारवंटा । भ्रमें चालिले आव्हाटा । भरला कांटा वडवडित ॥ १३ ॥ देखोनि भक्तां गुरगुरित । पाषांडवादें कलहो करित । सदा हरिभक्तां द्वेषित । उपहासित भक्तिक्रिये ॥ १४ ॥ [2]असो ते माया मोहिले । अभिमानातें आंदण दिधले । कामक्रोधीं ते गिळिले । पाशीं बांधिले तृष्णेच्या ॥ १५ ॥ भक्तमहाराज भूपति । निंदाद्वेषांतें न गणिती । परमामृतें तृप्त असती । मायाभ्रांति तयां नसे ॥ १६ ॥ शांत ते सद्गुरुनिधान । भक्तां बोळले कृपाघन । तेंचि कथानिरोपण । आचार्य आपण दावित ॥ १७ ॥ पूर्व प्रक-रणीं निरोपण । अज्ञाननिरासें दाविलें ज्ञान । त्या ज्ञानाचें स्वरूप लक्षण । अज्ञान ज्ञातेपण उभयातीत ॥ १८ ॥ येथें आशंका भान । देह पुरुष प्रत्यक्ष प्रमाण । हें सांडूनियां आपण । देहातीत शून्य कां केला ॥ १९ ॥

**स्वदेहं शोभनं त्यक्त्वा पुरुषाख्यं च संमतम् ।**
**किं मूर्ख शून्यमात्मानं देहातीतं करोषि भोः ॥ ३२ ॥**

स्वदेह पुरुष आपण । विख्यात शोभन सांडून । कां मूर्खा आपआपण । करिसि शून्य देहातीत ॥२०॥ स्वयें स्वदेह शोभतोसि । रोकडें प्रकट हें सांडिसि । देहातीत शून्य हें म्हणसि । आपणासि अरे मूर्खा॥२१॥ देहातीत आत्मा कोणे ठायीं। त्यासि रूप लक्षण काई । तो कोणें देखिला काई । वायां प्रवाहीं कां पडसि ॥ २२ ॥ देहातीत आत्मा कोणातें । कधीं भेटला सांग मातें । असो आतां दावी त्यातें । तरी मी तूतें सत्य म्हणे ॥ २३ ॥ ऐसें तार्किकांचें मत । देहातें आत्मत्व मानित । प्रत्यक्ष प्रमाण म्हणत । देहातीत न मानिती ॥ २४ ॥ त्यांतें शंकराचार्य आपण । वेदवेदांतमत्तेंकरून । करी आशंकानिरसन । सावधान अवधारा ॥ २५ ॥

**स्वात्मानं शृणु मूर्ख त्वं श्रुत्या युक्त्या च पूरुषम् ।**
**देहातीतं निराकारं सुदुर्दर्शं भवादृशैः ॥ ३३ ॥**

पूर्ण आत्म्याचें [3]आत्मपण । मूर्खा ऐकें सावधान । श्रुतियुक्तिप्रमाण । पुरुष-लक्षण बोलिलें ॥ २६ ॥ देहातीत निजात्मला । [4]ज्ञानमय स्वतःसिद्धला । दृश्य देहातें प्रकाशिता । तो जाणता बुद्ध्यादिकां ॥ २७ ॥ मनश्चक्षुरादिक दृश्यें । आत्मसत्ते वर्तणें त्यांस । आत्मा तेथें अदृश्य । चिदाभास अविनाश ॥ २८ ॥

---

[1]केले अभिमानी ( क ). [2]असो ते माया मोहिली । अभिमानातें आंदण दिधली । कामक्रोधीं ते गांजिली । पोसणी जाली तृष्णेची॥ १५॥ ( क ).
[3] पूर्णपण ( क ). [4]ज्ञानमयता सिद्धसत्ता ( क ).

मनश्चक्षुरादिकें अज्ञान । त्यांतें नाहीं आत्मज्ञान । आत्मसत्ते विषयाचरण । करिति जाण नेणोनि ॥ २९ ॥ हे आपणांतें नेणंति । मा आत्मया काय जाणाति । जडें आत्मसत्ते जितीं । कल्पित भोगिती सुखदुःखें ॥ ३० ॥ कस्तूरी शेण अथवा मळ । कालविलिया थिल्लर समळ । सूर्य बिंबला जो केवळ । थिल्लरजळ स्पर्शेना ॥ ३१ ॥ थिल्लरीं टाकितां पाषाण । थिल्लरी जळ छिन्न भिन्न । अनेकीं बिंबला जो आपण । संचला सुभान द्रष्टृत्वें ॥ ३२ ॥

**अहं शब्देन विख्यात एक एव स्थितः परः ।**
**स्थूलस्त्वनेकतां प्राप्तः कथं स्याद्देहकः पुमान् ॥ ३४ ॥**

मीपणा नेणे देहे । मीपणा नेणती इंद्रियें । हीं तंव अज्ञानमयें । मीपण स्वयें नेणती ॥ ३३ ॥ अहं मी ह्मणे आपण । तो आत्मा स्वयें सज्ञान । एकला असे परिपूर्ण । जाण सर्वज्ञ प्रकृतिपर ॥ ३४ ॥ देह तंव अनेक भासत । भासले तैसेचि नासत । तरी तो कैसा देहवंत । पुरुष होत देहत्वें ॥ ३५ ॥ लहान थोर घट भास । भासती तैसे पावती नाश । घटप्रतीत जें आकाश । घटपण त्यास लागेना ॥ ३६ ॥

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ ३५ ॥**

जन्ममरण नाहीं ज्याला । नाहीं झाला नाहीं केला । कधींही जन्ममरणाला । नसे स्पर्शला निजात्मा ॥ ३७ ॥ अविनाश शाश्वत पुरातन । त्यासि मारिता दुजा कोण । [1]शरीरनाशें जो आपण । नाश होऊनि जात नसे ॥ ३८ ॥ जो जड देहातें जाणता । तो विदेह देहापरता । देहपणें न लिंपतां । द्रष्टा तत्वतां देहातीत ॥ ३९ ॥

**अहं द्रष्टृतया सिद्धो देहो दृश्यतया स्थितः ।**
**ममायमिति निर्देशात्कथं स्याद्देहकः पुमान् ॥ ३६ ॥**

अहं मी ऐसें जाणत । द्रष्टृत्व सिद्ध तया असत । देह तंव ऐसें नेणत । दृश्य होय द्रष्ट्याचें ॥ ४० ॥ देह तंव प्रकृति भान । तया कैंचें आत्मज्ञान । मी माझें देह जाण । निश्चय आपण जो करी ॥ ४१ ॥ भानु जळीं प्रति बिंबता । परी तो जळातें प्रकाशिता । तो असे तयापरता । विश्वाकारता प्रकाशी ॥ ४२ ॥ दृश्य प्रकाशी द्रष्टेपणें । तया दृश्य केसेनि होणें । आत्मया देह केसेनि ह्मणणें । अविकार असणें आचार्य ह्मणे ॥ ४३ ॥ मी तंव असें विका-

**अहं विकारहीनस्तु देहो नित्यविकारवान् ।**
**इति प्रतीयते साक्षात्कथं स्याद्देहकः पुमान् ॥ ३७ ॥**

---

[1]शरीर नाशिवंत आपण । नाश होऊनि जातसे ( अ ).

ररहित । निर्विकार पूर्ण शाश्वत । देह गुणांचें विकारवंत । दोष भासत कामादिक ॥ ४४ ॥ गर्भी असणें आणि जन्मणें । बाळ तारुण्य ह्मातारपण । मरण षड्विकार गुण । देहाचें जिर्णे विकारवंत ॥ ४५ ॥ इच्छा द्वेष सुख दुःख । संघात

**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ३८ ॥**

चेतना धृति वोळख । इत्यादि कल्पनात्मक । क्षेत्र देख शरीर हें ॥ ४६ ॥ ऐसें जाणे जो देहातें । देह तंव नेणे तयातें । तया साक्षभूता पुरुषातें । देहत्व यातें घडे कैसें ॥ ४७ ॥ जो दृश्य देखे देहातें । देहत्व नाहीं तयातें । सूर्य प्रकाशी दृष्टीतें । विकार त्यातें असेना ॥ ४८ ॥ पुरुष अविकार सर्वगत । एकला स्वयेंचि नांदत । ऐशा श्रुति गर्जत । आचार्य दावित श्रुतिवचन ॥ ४९ ॥

**सर्वं पुरुष एवेति सूक्ते पुरुषसंज्ञके ।**
**अप्युच्यते यतः श्रुत्या कथं स्याद्देहकः पुमान् ॥ ३९ ॥**
**यस्मात्परामिति श्रुत्या तया पुरुषलक्षणम् ।**
**विनिर्णीतमसूढेन कथं स्याद्देहकः पुमान् ॥ ४० ॥**

सर्व पुरुष ह्मणे श्रुति । बोलिलें प्रत्यक्ष पुरुषसूक्तीं । आणि उपनिषदें गर्जती । पुरुष [1]प्रकृति दावित ॥५० ॥ ऐसें आपण बोलती श्रुति । देहत्व घडे कैशा रीती । सर्वगता पुरुषाप्रति । देहत्वभ्रांति घडेना ॥ ५१ ॥ ऐसा जो पुरुषपर । ज्याहूनि कांहीं नाहीं थोर । पुरुषलक्षण निर्धार । केला साचार श्रुतिवचनीं ॥ ५२ ॥ देह एकदेशी परिच्छिन्न । पुरुष व्यापक परिपूर्ण । ऐसें बोले श्रुति वचन । आणि श्रीकृष्ण बोलिले ॥ ५३ ॥ जैसें सर्वगत सूक्ष्मपणें । आकाशासि अलिप्त असणें । तेविं सर्व

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथाऽऽत्मा नोपलिप्यते ॥ ४१ ॥**

देहीं वसणें । अलिप्तपणें निजात्मा ॥ ५४ ॥ शस्त्रें छेदिलें न जाय गगन । आत्मा

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥ ४२ ॥**

अच्छेद्य परिपूर्ण । गगन जाळूं न शके अग्न । दृश्यमान न घडे आत्मा ॥ ५५ ॥ आकाश भिजेना प्रबळ जळें । वायु सोखूं न शके बळें । न भिजे न सोखे कदाकाळें । आत्मा निर्मळ निजांगें ॥ ५६ ॥ आत्मा अद्वैत निष्कळंक । नाहीं व्याप्य आणि व्यापक । देह मिथ्या मायिक। असंग एक निजात्मा ॥५७॥ पुरुष अद्वय एकला

---

1 प्रतीति ( क ).

**असंगः पुरुषः प्रोक्तो बृहदारण्यकेऽपि च ।**
**अनंतमलसंश्लिष्टः कथं स्याद्देहकः पुमान् ॥ ४३ ॥**

पूर्ण । असंग ज्ञानमय गगन । व्याप्यभेदें व्यापकपण । परी तो आपण निर्लेप ॥ ५८ ॥ ऐसें बृहदारण्यकीं श्रुति । निश्चयें स्वयें बोलती । आणि गीतेमाजी श्रीपति ।

**उपद्रष्टाऽनुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ ४४ ॥**

स्वयें निश्चिति बोलिला ॥ ५९ ॥ देह दृश्यत्वें द्रष्टृत्व दिसे । देह मिथ्यत्वें द्रष्टा नसे । देहीं आत्मा भोक्ता असे । अहंते भासे परी वेगळा ॥ ६० ॥ हा महेश्वरु परात्परु । परमात्मा सर्वेश्वरु । देहीं मिथ्यत्वें अहंकारु । परी हा परु देहत्रया ॥ ६१ ॥ जैसा सूर्य स्वप्रकाश । अनेक जळीं बिंबत्व भास । परी तो अलिप्त तयास । जळाभास लागेना ॥ ६२ ॥ हेंचि शंकराचार्य वेदांतमतें । प्रतिपादन केलें निश्चयार्थे । बृहदारण्यक श्रुत्यर्थे । सिद्धांत अर्थ जाहला ॥ ६३ ॥ पुरुष असंग अविकारु । देह अनंतमळीण सविकारु । म्हणऊनि पुरुषा देहाकारु । हा तो प्रकारु घडेना ॥ ६४ ॥ थिल्लरचि नव्हे भुभान । घटचि नव्हे कीं गगन । तरंगचि नव्हे जीवन । भिंती आपण

**तत्रैव च समाख्यातः स्वयं ज्योतिर्हि पूरुषः ।**
**जडः परप्रकाश्योऽसौ कथं स्याद्देहकः पुमान् ॥ ४५ ॥**

चित्र नव्हे ॥ ६५ ॥ एवं वचन विख्यातपण । श्रुति आणि भगवद्वचन । पुरुष स्वयंज्योति आपण । स्वयें असणें स्वप्रकाश ॥ ६६ ॥ जड देहानें जो प्रकाशी । देहत्व घडे केसें त्यासि । म्हणऊनियां पुरुषासि । देहत्व ऐशी मातु न घडे ॥ ६७ ॥

**प्रोक्तोऽपि कर्मकाण्डेन ह्यात्मा देहाद्विलक्षणः ।**
**नित्यश्च तत्फलं भुंक्ते देहपातादनन्तरम् ॥ ४६ ॥**

कर्मकांडीं हें श्रुतिवचन । आत्मा देहासि विलक्षण । स्वयें नित्यरूप आपण । जन्ममरण त्या नाहीं ॥ ६८ ॥ स्थूळदेहीं देहाभिमान । धरूनि करी कर्माचरण । देह पडल्या आपण । भोगी जाण कर्मफळ ॥ ६९ ॥ एवं अनेक देह धरणें । अनेक कर्में आचरणें। अनेक जन्म अनेक मरण। देहाभिमानें भोगितु॥ ७० ॥ कर्मकांडीं बोलती श्रुति । परदेहीं आत्मधर्म नव्हती। श्रीशंकराचार्य कृपामूर्ति। श्लोकार्थी बोलत ॥ ७१ ॥

**लिंगं चानेकसंयुक्तं चलं दृश्यं विकारि च ।**
**अव्यापकमसद्रूपं तत्कथं स्यात्पुमानयम् ॥ ४७ ॥**

चित्तचतुष्टय पंचप्राण । दश इंद्रियें विषय जाण । इत्यादिकीं मिळून । लिंग आपण

वासनामय ॥ ७२ ॥ इत्यादिकांचें लिंगशरीर । चंचळ साभास सविकार । स्थूळीं धरी अहंकार । कर्मे विचित्र स्वये करी ॥ ७३ ॥ पापपुण्याचें फळ । सुखदुःखें भोगी सकळ । पुनःपुन्हां मागुती स्थूळ । वासना सबळ कर्मे करी ॥ ७४ ॥ यातें आत्मसत्ते चळण । यातें आत्मचिंतन । कर्तृत्व भोक्तृत्व अभिमान । घडे जाण आत्मसत्ते ॥७५॥ थिल्लरें दिसती सकळ। एक समळ एक निर्मळ । बिंबला सूर्यचि केवळ। चंचळ निश्चळ नसोनियां॥७६॥ जळींचें भान जळींच असे । बिंबला त्यातें स्पर्शही नसे । प्रतिबिंबीं अनेक दिसे । सूर्य प्रकाशें पूर्णघन ॥ ७७ ॥ तेविं लिंगदेहाचे विकार । लिंगदेहीं असती फार । आत्मा सहज निर्विकार । पूर्ण अपार निर्द्वंद्व ॥ ७८ ॥ देह कल्पित नाशिवंत । भासत नासत मिथ्याभूत । तरी त्या कैंचें पुरुषत्व । पुरुष अनंत पूर्णत्वें ॥ ७९ ॥ ऐसा देहद्वयातीत । पूर्ण आत्मा अखंडित । जो सर्वात्मा

**एवं देहद्वयादन्य आत्मा पुरुष ईश्वरः ।**
**सर्वात्मा सर्वरूपश्च सर्वातीतोऽहमव्ययः ॥ ४८ ॥**

सर्वगत । पूर्ण अनंत एकला ॥ ८० ॥ आत्मा पुरुष ईश्वर । पूर्णत्वातें नाहीं पार । जो अपार अपरापर । निर्विकार पूर्णस्थिति ॥ ८१ ॥ जो सर्वात्मा सर्वपणें । विश्वरूप आपआपण । जेविं जळींच तरंगपण । स्वयें असणें अद्वैत ॥ ८२ ॥ चित्रें दिसतां असे भिंती । चित्रें भासती नासती । भिंतीमाजी तों ते नसती । तरंगाकृति जळीं नसे ॥ ८३ तेविं सर्वात्मा सर्वपणें । सर्वातीत जेणें असणें । नामरूप विकार गुण । विकारी होणें घडेना ॥ ८४ ॥ नामरूपविकारव्यक्ति । भासती तैशाच नासती । निर्विकार आत्मस्थिति । ह्मणऊनि ह्मणती सर्वातीत ॥ ८५ ॥ सर्वातीत अविनाश । अज अव्यय निराभास । जया नाहीं भास नाश । पूर्णत्वासि पार नसे ॥ ८६ ॥ एवं देहद्वयातीत । आत्मा सदोदित शाश्वत । न घडे सत्य तें असत्य । असत्य तें सत्य घडेना ॥ ८७ ॥ आत्मा सदोदित पूर्णघन । आत्म्यानें प्रपंचा सत्यपण । जेविं

**इत्यात्मदेहभेदेन प्रपंचस्यैव सत्यता ।**
**यथोक्ततर्कशास्त्रेण किं ततः पुरुषार्थता ॥ ४९ ॥**

तरंगत्वाचें भान । जळेंचि करूनि दिसे ॥ ८८ ॥ ऐसा आत्मा परिपूर्ण । तया देहत्व मानून । प्रपंचासि सत्यपण । मानिलें आपण तर्कशास्त्रीं ॥ ८९ ॥ तर्कशास्त्राचें मत ऐसें । देह हाचि आत्मा असे । प्रपंच सत्यचि प्रकाशे । आत्मा नसे देहातीत ॥ ९० ॥ ऐसें बोले तर्कशास्त्र । त्याचा कायसा पुरुषार्थ । आत्मा सत्य देह मिथ्या । ऐसा सिद्धांत वेदांतीं ॥ ९१ ॥ आत्मा अभेद परिपूर्ण । अखंड अद्वैत भेदशून्य । सत्य ज्ञानानंदघन । सहज आपण सदोदित ॥ ९२ ॥

**इत्यात्मदेहभेदेन देहात्मैक्यं निराकृतम् ।**
**इदानीं देहभेदस्य ह्यसत्त्वं स्फुटमुच्यते ॥ ५० ॥**

आत्मा देहातीत परिपूर्ण । देह मिथ्या परिच्छिन्न । आत्मादेहभेदेंकरून । निवारिली जाण देहात्मता ॥ ९३ ॥ आतां देहभेदेंकरून । आत्मत्वीं दिसे भेदभान । तें तंव मिथ्यावचन । शंकर आपण स्पष्ट वदे ॥ ९४ ॥ ऐशा नाना युक्ति प्रयुक्ती । आत्मा देहातीत प्रतीति । दाविली आतां देहभ्रांति । निरसी वेदोक्ती आचार्य ॥ ९५ ॥ आत्मा अद्वैत परिपूर्ण । तेथें देहत्वें प्रपंचभान । दिसताहे प्रत्यक्षप्रमाण । आत्मा आपण अभेद कैसा ॥ ९६ ॥ आतां ये आशंकेची निवृत्ती । करील आचार्य कृपामूर्ति । अवधान द्यावें हरिभक्तीं । कृपामूर्ति तुष्टेल ॥ ९७ ॥ सद्गुरु माउली कृपाकरें । वाढीतसे स्वानंदभरें । भक्ती जेवणारे आदरें । श्रवणपात्रें १सज्जावीं॥९८॥ नाना उक्तीचिया परवडी । सदन्नें सुस्वादें रोकडीं । ग्रास घेतां आवडी । चढोवढी स्वानंदु ॥ ९९ ॥ सद्गुरु दाता निजमंदिरीं । अखंड समाराधना करी । एकां तृप्ति जाहली पुरी । एकीं जेविणारीं जेविजे ॥ १०० ॥ एकीं पात्रें घातली । एकीं स्नानें असे केलीं । एक स्नानातें निघालीं । एकें आलीं ऐकोनियां ॥ १ ॥ एक धाले ढेंकर देती । एक आवडी जेविती । सद्गुरु दाता कृपामूर्ति । दीनांप्रति दयाळू ॥ २ ॥ सद्गुरु मायबाप पाहें । अखंड उभारिली बाहे । परमानंद वर्षताहे । भेटी लाहे तो धन्य ॥ ३ ॥ श्रीशांत श्रीकृष्ण गुरु— । राजा कृपाळू उदारु । मी तंव पोसणा डिंगरू । सदा किंकर अनन्य ॥ ४ ॥ आणिक वेतन मज नसे । घरींच्या घरीं जेऊनि असें । संतांचिया उच्छिष्टशेषें । धाला बैसें महाद्वारीं ॥ ५ ॥ महाद्वारीं बैसोनि पाहें । नामें नित्य गर्जताहे । संत उभारूनि बाहे । निःसंदेह कुरवाळिती ॥ ६ ॥ संत पाहती कृपादृष्टी । सांगती अंतरींच्या गोष्टी । तेणें जाहली पूर्ण पुष्टी । स्वसंतुष्टि सर्वदा ॥ ७ ॥ सद्गुरुनाथें सुखीकरून । हेंचि कार्य मजलागुन । अखंड नमावे संतचरण । आशीर्वाद पूर्ण पैं द्यावा ॥ ८ ॥ श्रीकृष्णदास जयराम । ऐसें ठेऊनियां नाम । संतचरणीं निजप्रेम । दिधलें परम कृपाळुवें ॥ ९ ॥ हा ग्रंथ अपरोक्षानुभूति । स्वात्मसुखाची सद्यः प्रतीति । श्रोतां अवधारावें प्रीती । स्वात्मस्थिति सफळित ॥ १० ॥ इति श्रीअपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुखगौरव । देहातीत आत्मा अनुभव । प्रकरण स्वयमेव चौथें हें ॥१११॥

ॐ नमो सद्गुरु निरोपमा । सिद्ध शांत परब्रह्म । श्रीकृष्ण आत्मयारामा । नाहीं सीमा पूर्ण तुज ॥ १ ॥ पूर्ण अनंत अप्रमित । अपर सिद्ध सदोदित । अभेद अद्वैत अखंडित । दुजा येथें ह्मणतां नाहीं ॥ २ ॥ तुझें पूर्णत्व पाहूं जातां । नुरे पाहणेसि पाहतां । लवण जीवनीं प्रवेशतां । लवणता उरेना ॥ ३ ॥ जैसें गगनाचें पूर्णपण । पाहूं जातां तो पवन । तंव हारपलें चळण । एकलें गगन गगनपणें ॥ ४ ॥ तैसें

१ मांडावीं ( क ).

तुज जाणों जातां । नुरे जाणिवेसि जाणता । नुरे देह देहात्मता । व्याप्यव्यापकता दिसेना ॥ ५ ॥ व्याप्य नसतां व्यापकपण । केविं दुजेविण एकपण । भेद नसतां अभेदपण । द्वैतेविण अद्वैत ॥ ६ ॥ पुत्रेविण घडे माता । कीं पुरुषेविण पतिव्रता । स्त्री नसतां भ्रतारता । हें सर्वथा घडेना ॥ ७ ॥ आला नसतां ह्मणिजे मेला । कीं उपजला नाहीं तो मेला । घडे सत्यत्व या बोला । तरी भेदाला सत्यत्व ॥ ८ ॥ १सत्य असावें अभेदभान । जरी वस्तूसि घडे अभेदपण । सत्य असावें दृश्यभान । द्रष्टेपण तें घडे ॥ ९ ॥ एवं व्याप्यव्यापकत्व । न घडे दृश्य आणि द्रष्टृत्व । निखळ अद्वैत पूर्णत्व । द्वैताद्वैत ह्मणे कोण ॥ १० ॥ ऐशी सिद्ध स्वरूपस्थिति । सहजपणेंचि आइती । कवणा घडावी प्रतीति । २सिद्धसंविति सहजपणें ॥ ११ ॥ देखिलें नाहीं दुजेपण । एक ह्मणावया ह्मणतें कोण । सिद्धचि ज्ञानानंदघन । ह्मणावया जाण ह्मणतें नसे ॥ १२ ॥ असो ऐशी निजात्मस्थिति । असोनि नाहीं अज्ञानाप्रति । अज्ञान तंव मिथ्या भ्रांति । बागुल ह्मणती जयापरी ॥ १३ ॥ बागुल तंव मिथ्या असे । बाळका भय सत्यत्वें असे । भोवंडी भरे तया जैसें । भोंवतां दिसे सर्वही ॥ १४ ॥ ऐसें अज्ञानें जीवपण । तेथें जाहलें विपरीत ज्ञान । असत्य सत्यचि प्रमाण । आणि सत्य जाण असोनि नसे ॥ १५ ॥ ऐसें मिथ्याचि आपण । अविद्या उपाधि जीवपण । जैसें स्वप्नींचें भान । स्वप्नीं पूर्ण विस्तारे ॥ १६ ॥ तया नांव भव संसार । महा अटव्य अतिदुस्तर । मायामय महाघोर । लटिकाची थोर भ्रमें भासे ॥ १७ ॥ येथें वेदशास्त्रसंपन्न । परम ३व्यक्त शब्दज्ञान । पुढती परी तया जाण । भ्रमावरण फिटेना ॥ १८ ॥ शब्दें माया मिथ्या ह्मणती । परी नुल्लंघवे मोहो भ्रांति । तेथें तरिजे हरिभक्तीं । ज्यांची प्रीति गुरुचरणीं ॥ १९ ॥ स्वधर्में हरिनामस्मरण । वैराग्य विवेक शमदमाचरण । उपरति तितिक्षा मुमुक्षा पूर्ण । त्यासिच आपण ठसावे ॥ २० ॥ अनन्य प्रीति गुरुचरणी । दृढ जननीजनकाहूनि । वेदवचनीं गुरुवचनीं । निष्ठेकरूनि सावध ॥ २१ ॥ गुरुरूपें केला विचार । निरासिले अज्ञानविकार । पावूनि ज्ञान निर्धार । साक्षात्कार स्वरूपीं ॥ २२ ॥ दृश्य देहातीत आपण । आत्मा पूर्ण चैतन्यघन । देहादिभेदेंकरून । भेदभावना नाहीं तया ॥ २३ ॥ आत्मा सिद्धचि अभेद । आणि देहाचे ठायीं दिसे भेद । हें तंव मिथ्या विशद । आचार्य सावध ऐका ह्मणे ॥ २४ ॥ ऐसें मुळींहूनि निरोपण । आचार्यें आणिलें घडून । जीव देह मिथ्या भान । सांगे सर्वज्ञ शंकरु ॥ २५ ॥ चैतन्य ज्ञानमय पूर्ण । एक-

**चैतन्यस्यैकरूपत्वाद्भेदो युक्तो न कर्हिचित् ।**
**जीवत्वं च मृषा ज्ञेयं रज्जौ सर्पग्रहो यथा ॥ ५१ ॥**

---

१सत्य असावें भेदभान । तरी वस्तूसि घडतें अभेदपण । सत्य असावें दृश्यभान । द्रष्टेपण तरी घडे ॥९॥ (क). २सेविती ( क ). ३वर्के ( बोलकें ) ( क ).

रूप अद्वैत चिद्घन । स्वयें स्वतःसिद्ध आपण । द्वैताचा लेश असेना ॥ २६ ॥ जें अभेद पूर्ण संचले । भेदयुक्त नाहीं जालें । सहज एकत्व एकलें । आपण कोंदलें ज्ञानमय ॥ २७ ॥ येथें आशंका ऐशी असे । जे जीवत्व भेद प्रत्यक्ष दिसे । भेद असतां अभेद ऐसें । घडे कैसें प्रमाण ॥ २८ ॥ ये आशंकेचें खंडण । करी आचार्य ज्ञानघन । जीवत्व मिथ्या जाण । सावधान श्रवणार्थ ॥ २९ ॥ दोराच्या ठायीं सर्पभान । देखे तया प्रत्यक्ष प्रमाण । भयें घडे कंपायमान । जंव तो आपण भ्रम असे ॥ ३० ॥ भ्रम निरसूनियां पाहे । तंव दोर दोरपणें आहे । आप आपण उगा राहे । सहज निर्भय एकला ॥ ३१ ॥ सर्पाआदिअंतीं दोरु । मध्येंही दोरपणें दोरु । मिथ्या भासला सर्पाकारु । भ्रमें अजगरु नसोनि दिसे ॥ ३२ ॥ त्या सर्पाची उत्पत्तिस्थिति- । प्रळय आवघी मिथ्या भ्रांति । तैसी जीवत्वाची भ्रांति । मिथ्या

**रज्ज्वज्ञानात्क्षणेनैव यद्वद्रज्जुर्हि सर्पिणी ।**
**भाति तद्वच्चितिः साक्षाद्विश्वाकारेण केवला ॥ ५२ ॥**

प्रतीति मिथ्या दिसे ॥ ३३ ॥ दोराचें ज्ञान जये क्षणीं । सर्पाकारही दिसतां नयनीं । देखे तो दोर ऐसें मानी । सर्प मनीं धरीना ॥ ३४ ॥ दोरचि सर्पाकार दिसे । परी तो यथार्थ सर्प नसे । एवं आहे तें चिद्रूप असे । साक्षात् जैसें तैसेंचि ॥ ३५ ॥ अचिंत्य अविनाश निर्मळ । दिसे विश्वाकार केवळ । तरंगत्वें दिसे जळ । परी अमळ अविनाश ॥ ३६ ॥ अविनाशवस्तुनिराभास । तोचि कारण प्रपंचास ।

**उपादानं प्रपंचस्य ब्रह्मणोऽन्यं न विद्यते ।**
**तस्मात्सर्वः प्रपंचोऽयं ब्रह्मैवास्ति न चेतरत् ॥ ५३ ॥**

जैसा मृगजळ भास । कारण प्रकाश स्वयें असे ॥ ३७ ॥ घटाचें कारण मृत्तिका असे । पटाचें कारण तंतू वसे । चित्राचें कारण भिंती दिसे । जळाचि दिसे तरंगीं ॥ ३८ ॥ तेविं या प्रपंचासि कारण । ब्रह्मचि एक परिपूर्ण । प्रपंच हें कार्य जाण । वस्तु कारण स्वयें नांदे ॥ ३९ ॥ घट मृत्तिकारूपें असे । मृत्तिकेमाजी घट नसे । प्रपंच ब्रह्मरूप भासे । ब्रह्मीं नसे प्रपंचत्व ॥ ४० ॥ जळाचिया भासती गारा । त्या जळरूपाचि साचारा । उद्भवप्रभवलयाकारा । तन्हि त्या निरा निर-रूप ॥ ४१ ॥ गारपणीं भास नाश । परी तें जळचि अविनाश । या कारणें प्रपं-चास । ब्रह्मत्वास कारणत्व ॥ ४२ ॥ ह्मणऊनि प्रपंच परब्रह्म असे । इतर दुजें कांहीं नसे । प्रपंच ह्मणिजे कल्पनावशें । सिद्ध अनायासें परब्रह्म ॥ ४३ ॥ सिद्ध अद्वैत एकलें एक । तेथें कोण व्याप्य व्यापक । व्याप्य व्यापक हें कौतुक । मायिक देख नसतेंचि ॥ ४४ ॥ आणि व्याप्य दुजें असावें । तरी व्यापक वस्तूसि ह्मणावें ।

**व्याप्यव्यापकता मिथ्या सर्वमात्मेति शासनात् ।**
**इति ज्ञाते परे तत्त्वे भेदस्यावसरः कुतः ॥ ५४ ॥**

सिद्ध अद्वैत स्वभावें । व्यापक होणें कवणें कवणा ॥ ४५ ॥ जैसें आपणातें आपण । न घडे व्याप्य व्यापकपण । सहज अद्वैत परिपूर्ण । ह्मणावया कोण तेथें दुजें ॥ ४६ ॥ तेथें व्याप्यव्यापकता मिथ्या । पूर्ण अद्वैत अनंता । कैंची व्याप्यव्यापकता । ठाव रिता असेना ॥ ४७ ॥ एकमेवाद्वितीयं नास्ति । एकमेवाद्वितीयं ब्रह्म श्रुति । ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति । श्रुतिसिद्धांत शासन ॥ ४८ ॥ ह्मणोनि सर्वात्मा हें शासन । आत्मैव सर्वं हें श्रुतिवचन । सिद्धांत केला प्रमाण । एकला पूर्ण निजात्मा ॥ ४९ ॥ एकला निजात्मा आपण । पूर्ण पूर्णत्वें ज्ञानघन । नाहीं व्याप्यव्यापकपण । दुजेंन-विण संचला ॥ ५० ॥ नाहीं दृश्य द्रष्टा दर्शन । नाहीं ध्येय ध्याता ध्यान । नाहीं ज्ञेय ज्ञाता ज्ञान । निजात्मा आपण एकला ॥ ५१ ॥ नाहीं जीवशिवत्व । नाहीं देव आणि भक्त । कैंचें मी तूं उरलें येथें । एकला सत्य निजात्मा ॥ ५२ ॥ ऐशी हे निजात्मस्थिति । बाणली जया पूर्णस्थिति । तया नाहीं भेदभ्रांति । सुखसंविति अखंड ॥ ५३ ॥ बाणलें जया निजात्मज्ञान । परम तत्त्वाचें परिपूर्ण । निष्ठा बाणली समाधान । निर्विकार जाण निजशांति ॥ ५४ ॥ अखंड एकला आत्माराम । स्वानंदें सदोदित परम । कैंचा तेथें क्रोधकाम । जाहला उपरम मीपणा ॥ ५५ ॥ निरपेक्ष निर्वैर निर्विकार । जो अमळ अचळ अपार । पूर्ण स्वानंदसागर । अपरपार ज्ञान-घन ॥ ५६ ॥ ऐसें परम तत्त्वाचें जया ज्ञान । तया कैंचें भेदभान । भेद भावी मिथ्या मन । तें निमग्न स्वरूपीं ॥ ५७ ॥ ह्मणऊनि सज्ञानाचे ठायीं । भेदाभेद निःशेष नाहीं । अखंड अभेद ठायींच्या ठायीं । आत्मा सर्वही आप-णचि ॥ ५८ ॥ येथें भासे आशंकाभान । जरी आत्मा अभेद पूर्ण । तरी कासया श्रुतिवचन । विविध निरोपण पैं केलें ॥ ५९ ॥ ये आशंकेचा परिहार । करी आचार्य शंकर । श्रोतीं परिसावें सादर । सिद्धांत सधरु करिताहे ॥ ६० ॥ ये आशंकेचें निरसन । सांगेल पुढील प्रकरण । तोडील सकळ अनुमान । आचार्य सर्वज्ञ बोलिला ॥ ६१ ॥ सद्गुरु माउली अमृतवचन । शिष्य बाळकाकारण । विविध प्रकार निरोपण । तृप्ति देणें अखंडित ॥ ६२ ॥ जाणते जेविती सत्वर । तृप्ति पावती सादर । नेणते नेणती प्रकार । पाहती वक्त्र माउलीचें ॥ ६३ ॥ तयांलागीं गुरुमाता । कृपा निजकरें तत्वता । ग्रास करूनि मुखापुरता । लावी स्वादता निजरुचि ॥ ६४ ॥ लहान ग्रास मुखकमळीं । घालूनि मस्तक कुरवाळी । तृप्ति पावे आह्ळीबाह्ळीं । सुखसोहळीं दोंदिल ॥ ६५ ॥ नेणतें परि अनन्य । दुजें नेणें माउलीविण । त्याची क्षुधा ते आपण । लागे पूर्ण माउलिये ॥ ६६ ॥ तैसा मी अनन्य शरण । माउली माझी श्रीकृष्ण । कृपें वोसंगा घेऊन । दे समाधान निजकरें ॥ ६७ ॥ कृपाळू सद्गुरु माउली । निजात्मस्थितिपाळणा घाली । सुखें निजनिद्रा लागली । वृत्ति बुडाली स्वानंदीं ॥ ६८ ॥ मन इंद्रियें सहित बुद्धि ।

समत्वें निमग्न समाधी । अखंड संचली सुखसिद्धि । सीमा स्वानंदीं कोण करी॥६९॥ तया स्वानंदीं आपण । सुखी ह्मणतां दुजें कोण । मीतूंपणा बोलवण । सुखा सुखपण काय होये ॥ ७० ॥ प्रकाशा काय प्रकाशु । गोड काय रसा रसु । सूर्या काय उगवे दिवसु । आनंदाभासु स्वानंद ॥ ७१ ॥ ऐशी सिद्धस्वानंदस्थिति । सद्गुरुरूपें आइती । शिष्य बाळकाप्रती । भोगवी निश्चिति गुरुमाता ॥ ७२ ॥ सिद्धाचि सुखमय होऊन । निद्रा न मोडतां आपण । स्वानंदें क्रीडती अनन्य । कृपाळू पूर्ण गुरुमाता ॥ ७३ ॥ सद्गुरु माता माझी स्वयें । मी नेणें आन उपाये । आधार मज श्रीकृष्णपाय । सहज सुखमय श्रीकृष्णीं ॥ ७४ ॥ श्रीकृष्ण माझें मीपण । श्रीकृष्ण माझें निजमन । श्रीकृष्ण माझें वदन । श्रीकृष्ण कीर्तन श्रीकृष्णीं ॥ ७५ ॥ श्रीकृष्ण वक्ता श्रीकृष्ण श्रोता । श्रीकृष्ण स्वयें श्रीकृष्ण कथा । श्रीकृष्ण आनंद श्रीकृष्ण भोक्ता । श्रीकृष्ण स्वतां निजात्मा ॥ ७६ ॥ श्रीकृष्णदास जयराम । श्रीकृष्ण स्वयें श्रीकृष्णनाम । श्रीकृष्ण स्वानंद परम । नाहीं सीमा श्रीकृष्णा ॥ ७७ ॥ निजात्मस्थिति निरोपण । स्वयें बोलिला श्रीकृष्णघन । श्रोते चातक श्रवण । करितां संपूर्ण सुखसिद्धि ॥ ७८ ॥ इति श्रीअपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुखगौरव । सर्वात्मा स्वानुभव । प्रकरण स्वयमेव पांचवें ॥ ७९ ॥

ॐनमो सद्गुरु गृहस्था । निजधामपूर्णत्वें स्वस्था । मोक्षमार्गींचिया मार्गस्था । विश्रांतिदाता तूं एक ॥ १ ॥ साधनमार्गीं पावले शीण । अनुतापें तापले साधकजन । तुज पैं येती ह्मेऊनि दीन । सुखी संपूर्ण तूं कर्ता ॥ २ ॥ निजात्मता निजनिर्मळ । देसी जीवन सुशीतळ । तप्त निवोनिया सकळ । विश्रांति केवळ तूं देसी ॥ ३ ॥ क्षुधातुर जे दीनवदन । इंद्रियद्वारीं हिंडतां शीण । पावले दातया तुजवीण । तृप्ति पूर्ण तुझे हातीं ॥ ४ ॥ बहुता जन्मींचा पुण्यमेळ । फळ द्यावया जाहला सफळ । तरीच हरिभक्ति केवळ । तेव्हां कृपाळ तूं भेटसी ॥ ५ ॥ दीनानाथ दीनदयाळ । तूं भेटलासि कृपाळ । स्वात्मसुखाचा सुकाळ । विश्रांति केवळ निजदानीं ॥ ६ ॥ कृपाळू स्वामी समर्थ । अखंड उभारिला हस्त । तुज हरिहर शरणागत । ऋषि समस्त सिद्ध शरण ॥ ७ ॥ सकळ हें त्रैलोक्य पाहतां । तुजवीण नाहीं सुखी कर्ता । स्वानंदसुखाचा दाता । निजात्मता तूं स्वामी ॥ ८ ॥ ऐसा तूं कृपाळू गृहस्थ । निवविले निवताति मार्गस्थ । अपार सामर्थ्य परमार्थ । तूं समर्थ नांदसी ॥ ९ ॥ स्वामी तुझें निजमंदिर । स्वानंद अनंत अपार । निर्विकल्प निर्विकार। निरंतर निजस्थिति॥१०॥ गृहस्थ तूं जी पूर्णपण। स्वयें नांदसी अगम्यगुण। श्रुति शास्त्रें पुराणें । बंदीजन तुज गाती ॥११॥ ज्ञानधनें अतिसधन । सुखसंपत्ति परिपूर्ण । तेथें पतिव्रता आपण । शांति जाण अंगना तुझी ॥ १२ ॥

ते पतिव्रता आपण । सुखमय समाधान । होंचि अन्न परिपूर्ण । वाढी कृपेन याचकां ॥ १३ ॥ क्षुधातुर जे जे येत । पूर्ण धाले ढेंकर देत । महाराजा तुज स्तवित । पूर्ण तृप्त होऊनि ॥ १४ ॥ व्यासवाल्मीकशुकादिक । सनकादिक सिद्ध अनेक । १सद्भावें भजती देख । अवताारादिक अनन्य ॥ १५ ॥ सद्गुरु महाराज कृपामूर्ति । ब्रह्मांडीं न माये उदार कीर्ति । वाचा न पुरे करितां स्तुति । श्रुति राहती निमग्न ॥ १६ ॥ स्वामी करितां तुझें स्तवन । २वाचा न पुरे न उरे मन । बुडालें माझें मीपण । ह्मणे तूंपण कोण कोणा ॥ १७ ॥ सहज मीतूंपणेविण । सुख सुखत्वें परिपूर्ण । सुख ह्मणावया ह्मणतें कोण । नुरे भिन्न निजहेतु ॥ १८ ॥ हेतू-वीण घडे स्तुति । ते तंव तूंचि कृपामूर्ति । व्यास वाल्मीक हेचि स्थिति । करिती स्तुति दुजेनविण ॥ १९ ॥ जळीं जळत्वा दुजें नसे । तरंगाभासें क्रीडा दिसे । क्रीडतांही जैसें तैसें । संचलें असे जळमात्र ॥ २० ॥ तैशीच होय ही कथा । दास-पणें श्रीकृष्ण वक्ता । जयराम ऐसें ह्मणतां । श्रीकृष्णसत्ता एकली ॥२१॥ पूर्व प्रकरणीं निरोपण । परमतत्त्वाचें जया ज्ञान । त्यासि कैंचें भेदमान । अभेद पूर्ण ज्ञानिये॥२२॥ असतां अभेद परिपूर्ण । वेद कासयालागून । विविध करिती निरोपण । आशंका जाण हे आली ॥ २३ ॥ सज्ञानाचे ठायीं । भेदाभेद निःशेष नाहीं । अज्ञानाच्या देहीं । भेद पाहीं सत्य दिसे ॥ २४ ॥ कोणा एका भोवंडी वसे । नगर डोंगर भोंवतां दिसे । तें भोवंडीचें कार्य जैसें । प्रत्यक्ष भासे नसतेंचि ॥ २५ ॥ तेचि भोवंडीची निवृत्ति । करावया कीजे नानायुक्ति । भोवंडी निरसे तयाप्रति । डोंगर ३भोंवती हें न घडे ॥ २६ ॥ भ्रांति तेथें भेदभान । तयाचे निवृत्तीलागुन । वेदें विविध निरोपण । केलें जाण बोधार्थ ॥ २७ ॥ अज्ञानवृत्तीसि वेदवचन । तरी अज्ञाना आलें सत्य-पण । सत्यांच असतां अज्ञान । तरी निरसन घडेचिना ॥ २८ ॥ अंधारें सत्यचि असतें । तरी प्रकाशासि झुंजतें । अज्ञान सत्यचि वसतें । तरी न वचतें निजज्ञा-नेंही ॥ २९ ॥ बाळक भ्यालें बागुलातें । निर्भय करावया त्यातें । गेला मेला ह्मणि-जेतें । तरी काय त्यातें सत्यपण ॥ ३० ॥ निरसावया मिथ्याज्ञान । विविध श्रुतिनिरोपण । श्रीशंकराचार्य सर्वज्ञ । हेंचि जाण बोलती ॥ ३१ ॥ श्रुतीनें स्वमुखें आपण ।

**श्रुत्या निवारितं नूनं नानात्वं स्वमुखेन हि ।**
**कथं भासो भवेदन्यः स्थिते चाद्वयकारणे ॥ ५५ ॥**

निवारिलें एकदेशीपण । नानात्वें दिसे भेदभान । मिथ्या ज्ञान ह्मणे श्रुति ॥ ३२ ॥ मी देह आणि हे जन । भ्रमे प्रत्यक्ष प्रमाण । भ्रमाचें आवरण । श्रुतिवचन निवारी ॥ ३३ ॥ अद्वय स्वतःसिद्ध कारण । सिद्धचि असे वरी पूर्ण । तेथें कैंचें

---

१हरिहरब्रह्मा तुझे रंक । ( क ). २वाचा वाच्यत्वें नुरे मन । ( क ).
३भ्रमती ( अ ).

आनेआन । भाग जाण भिन्नत्वें ॥ ३४ ॥ आरिसा काय मुख असे । पाहे तयाचे तया दिसे । एक असोनियां नसे कैसें । हें पिसें भलतेंचि ॥ ३५ ॥ नसतां आरिसा द्वैतपण दिसे । अज्ञानयोगें द्वैत तेसें । अज्ञानातें सत्य ऐसें । प्रत्यक्ष भासे प्रमाण ॥ ३६ ॥ ह्मणे मी देह आपण । उपजलों मज येईल मरण । त्या संकल्पें होऊन । घडे येऊनि आचार्य ह्मणे ॥ ३७ ॥ श्रुति ह्मणे विहिततया । संकल्प १दुःख असे

**दोषोऽपि विहितः श्रुत्या मृत्योर्मृत्युं स गच्छति ।**
**इह पश्यति नानात्वं मायया वञ्चितो नरः ॥ ५६ ॥**

जया । जन्ममरण भोगावया । दुःख द्यावया संकल्प ॥ ३८ ॥ उपजलों मी मरेन स्वयें । ऐसा देहत्वें जया निश्चय । संकल्पें तया मृत्यु आहे । मरण होय मागुतेनि ॥ ३९ ॥ मृत्योर्मृत्युं स गच्छति । ऐसें बोले वेदश्रुति । मृत्युसंकल्प ज्याच्या चित्तीं । तो भोगी पंक्ती जन्ममरणा ॥ ४० ॥ अज्ञानें देखे नाना भेद । अनेक इच्छा विषयबाध । कल्पना वासना विविध । अज्ञान अंध जीवत्वें ॥ ४१ ॥ मायेनें वंचिले नर । माया देवता खेचर । तयालागीं निरंतर । पडला विसर स्वरूपीं ॥ ४२ ॥ माया भ्रमकारक या जनां । ते हे विषय कल्पना । नाना छंदें वासना । गोंधळ जाणा नाचतु ॥ ४३ ॥ पंचभूतें देहाची अहंता । यालागीं नांव ह्मणिजे भुता । वासना गोंधळी नाचतां । जोगवा मागतां न राहे ॥ ४४ ॥ अपेक्षा परडी घेतली करीं । विपरीत ज्ञान दिवटी धरी । चावटी चौंडका निरंतरीं । भेद कुसरी कवडे गळां ॥ ४५ ॥ कर्माकर्म दिसे कोडी । नाना दुःख व्याधी गाढी । भुत्याचे संगतीची आवडी । भिके गाढी आंगवण ॥ ४६ ॥ आईचा भुता जोगवा । जोगवा देगे माझे आवा । धरोनि सकाम सद्भावा । जोगवा बरवा हेचि मानी ॥ ४७ ॥ काया कुडी हे परवडी । जोगवा मागे तो बराडी । जिव्हा शिश्न धरोनि गोडी । बहु आवडी विषयभिके ॥ ४८ ॥ माया खेचरे मोहिले । आपुले सेवेसीं लाविले । हरिभजन चुकलें । ह्मणोनि केले भुते नर ॥ ४९ ॥ पुरुष भुते भुत्या नारी । घरोबा रचिला भिकेवरी । आईचे भुते चराचरीं । गोंधळाभीतरी नाचत ॥ ५० ॥ ऐसे दरिद्री करून । विषयभिके लाविले जन । लावावया हेंचि कारण । हे हरिभजन न करिती ॥ ५१ ॥ हरिभक्तीवीण माया । अति दुस्तर प्राणियां । मायाभ्रम तरावया । नाहीं बळिया तिहीं लोकीं ॥ ५२ ॥ नव्हती हरिभजनीं तत्पर । तोंवरी माया मोहिले नर । हरिभजनीं जो सादर । तया दुस्तर माया नसे ॥ ५३ ॥ हरीचें नाम मुखीं असे । हरीचें प्रेम हृदयीं वसे । हरिचिंतनीं मन कैसें । चंद्र जैसा चकोरा ॥ ५४ ॥ प्रिय सर्वस्वें श्रीहरि । देहभाव कुरवंडी करी । हरिरूपा तयावरी । दास्यत्व करी मूळ माया ॥ ५५ ॥ माया भगवंताची शक्ति । हरिलाघव तया

१दोष ( क ).

म्हणती । अभक्तांतें मोहभ्रांति । भक्तांप्रति कृपाळ ते ॥ ५६ ॥ भक्त भगवंतरूपें निभ्रम । भगवंत कृपाळू परम । गुरुरूपें हरी भ्रम । ज्ञान उत्तम प्रकाशी ॥ ५७ ॥ हरिगुरु कृपा प्रसन्न । भ्रांतिरहित निजज्ञान । फिटे अज्ञान आवरण । भगवंत आपण पूर्णत्वें ॥ ५८ ॥

**ब्रह्मणः सर्वभूतानि जायन्ते परमात्मनः ।**
**तस्मादेतानि ब्रह्मैव भवन्तीत्यवधारय ॥ ५७ ॥**

ब्रह्मापासोनि सर्व भूतें । जाहलीं ते ब्रह्मरूप निश्चितें । जळरूपता तरंगातें । अन्य त्यांतें म्हणिजेना ॥ ५९ ॥ ब्रह्मरूप सर्व भूतें । हरिरूपें त्यां निश्चितें । परमात्मस्वरूप त्यांतें । अनुभवातें निजनिष्ठे ॥ ६० ॥ ते निष्ठेनें बाणली स्थिति । हृदयीं समाधान शांति । अखंड स्वानंदप्रतीति । सर्वां भूतीं भगवंत ॥ ६१ ॥ याकारणें तो ब्रह्ममय । असे सिद्धचि तन्मय । म्हणे शंकरु आचार्य । अवधारय सच्छिष्या॥६२॥

**ब्रह्मैव सर्वनामानि रूपाणि विविधानि च**
**कर्माण्यपि समग्राणि बिभर्तीति श्रुतिर्जगौ ॥ ५८ ॥**

ब्रह्म ब्रह्मत्वें परिपूर्ण । जगत्वें भासे आपण । नामरूप विविध गुण । कर्म जाण समग्र ॥ ६३ ॥ ब्रह्मैव सर्वं ब्रह्माप्येति । सर्वं खल्विदं ब्रह्म हे श्रुति । ब्रह्मरूप सर्व म्हणती । आन त्रिजगतीं असेना ॥ ६४ ॥ जैसें भासे मृगजळ । तें तंव उष्णचि केवळ । नाम रूप जग सकळ । परी तें केवळ परब्रह्म॥ ६५ ॥ जैसा चित्रपटीं विविध । नामें रूपे दिसे भेद । परी तो तंतुचि अभेद । तैसा गोविंद सर्वां भूतीं ॥ ६६ ॥ सर्वं विष्णुमयं जगत् । ऐसें हे श्रुतिसंमत । प्रत्यक्ष भासत नासत । ब्रह्म हें सत्य कैसें ॥ ६७ ॥ जैसा तरंगीं भास नाश । परी जळ जळत्वें अविनाश । तैसीची जगद्भास । चित्प्रकाश भासतु ॥ ६८ ॥

**सुवर्णाज्जायमानस्य सुवर्णत्वं च शाश्वतम् ।**
**ब्रह्मणो जायमानस्य ब्रह्मत्वं च तथा भवेत् ॥ ५९ ॥**

अलंकारापूर्वी सुवर्ण । अंतीं तेंचि तें आपण । मध्यें अलंकारभान । तेंही सुवर्ण सत्यत्वें ॥ ६९ ॥ प्रपंचा आदि ब्रह्मपूर्ण । अंतीं तेंचि तें आपण । मध्यें जें प्रपंचभान । तेंही अभिन्न परब्रह्म ॥ ७० ॥ सुवर्णअलंकार भासत । ते तंव सुवर्णचि असत । ब्रह्मीं प्रपंच दिसत । त्यातें ब्रह्मत्व सहजचि ॥ ७१ ॥ हरिगुरुभक्ति नसे जया । हरि कृपाळू नसे तया । ब्रह्मत्व असोनि नेणावया । वंचिले मायामोहभ्रमें ॥ ७२ ॥ त्यासि जीवपरमात्मा ऐक्यस्थिति । न कळे कवळिले मिथ्या भ्रांती । जन्ममरणाच्या आवर्तीं । नसतींचि भोगिती सुखदुःख ॥ ७३ ॥

---

१ भ्रांति हरीत निजज्ञान ( अ ). २ पूर्णप्राप्ति. ३ ब्रह्मरूप स्वयें.
४ परब्रह्मरूप ( अ ). ५ ही ओवी क प्रतींत नाहीं. ६ तैसाचि शब्द जगद्भास ( अ ). ७ जें भासे ( क ). ८ मिथ्या कवळी भ्रांति ( क ).

**स्वल्पमप्यन्तरं कृत्वा जीवात्मपरमात्मनोः ।**
**यः संतिष्ठति मूढात्मा भयं तस्याभिभाषितम् ॥ ६० ॥**

अभेद परमात्मा परिपूर्ण । असोनि नेणती अज्ञान । स्वल्पही जें भेदभान । भवभय जाण असे तया ॥ ७४ ॥ जीवात्मा परमात्मा भिन्न । ऐशिया निश्चयें जो निमग्न । तोचि तो मूढ अज्ञान । तयातें जाण भवभय ॥ ७५ ॥ अज्ञान अथवा ज्ञान । अभिमान तेंचि द्वैतभान । तंववरी भ्रांतिआवरण । तयातें आपण भवभय ॥ ७६ ॥ मृत्योर्मृत्युं स गच्छति । मृत्युसंकल्प ज्याचे चित्तीं । तयातें मृत्यु ह्मणती श्रुति । आपुलें नेणती अमरत्व[1] ॥ ७७ ॥

**यत्राज्ञानाद्भवेद्द्वैतमितरं तत्र पश्यति ।**
**आत्मत्वेन तदा सर्वं नेतरं तत्र चाण्वपि ॥ ६१ ॥**

अज्ञानें जया जाहली भ्रांति । चमके आप आपणाप्रति । अद्वैतीं द्वैत भ्रांती पाहती । इतर देखती द्वैताचि ॥ ७८ ॥ नेत्र झांबळे[2] आभाळें । चंद्रमा मळनो ह्मणती बाळें । तेविं अभक्तां अज्ञानमळें । अद्वैत सगळें द्वैत दिसे ॥ ७९ ॥ भक्तां हरिकृपा प्रबळ । तयां सर्वात्मा निखळ । आत्मस्थितीनें केवळ । द्वैतपाल्हाळ असोनि नसे ॥ ८० ॥ तो न पाहे द्वैतभान । सर्वात्मा आपआपण । तया भासतां द्वैतभान । अभेद पूर्ण आत्मस्थिति ॥ ८१ ॥

**यस्तु सर्वाणि भूतानि ह्यात्मत्वेन विजानते ।**
**न च तस्य भवेन्मोहो न च शोको द्वितीयकः ॥ ६२ ॥**

जो सर्वां भूतांचे ठायीं । आत्मत्व जाणे सर्वही । आहाच वाहाच प्रतीति नाहीं (?) । निःसंदेह निजनिष्ठा ॥ ८२ ॥ मन आत्माकार तन्मय । इंद्रियज्ञान नांदे स्वयें । कर्म भासे ब्रह्ममय । प्रपंच होय परब्रह्म ॥ ८३ ॥ नाहीं भ्रांति नव्हे तो मोहितु । निभ्रम निर्मोहो वर्ततु । आत्मारामु तो शाश्वतु । असे स्वस्थिति स्वानंदें ॥ ८४ ॥ आपुला आपण शाश्वत सुख । नाहीं तया शोक दुःख । शोकासि मन विषयात्मक । ज्ञान सम्यक गिळी तया ॥ ८५ ॥ ऐशाचि बृहदारण्यका श्रुति । निजनिर्धारें गर्जती ॥ श्रीशंकराचार्य श्लोकोक्तीं । तेही प्रतीति दावी ॥ ८६ ॥

**अयमात्मा हि ब्रह्मैव सर्वात्मकतया स्थितः ।**
**इति निर्धारितं श्रुत्या बृहदारण्यकस्थया ॥ ६३ ॥**

मी आत्मा परब्रह्म स्वयें । सर्वात्मक ज्ञानमय । येणें ज्ञानें जो तन्मय । ब्रह्ममय तोचि तो ॥ ८७ ॥ ऐसा निर्धार केला श्रुति । बृहदारण्यका स्वयें वदती । ब्रह्मविदा ब्रह्मैव ह्मणती । निश्चयो करिती श्रुतिवचनें ॥ ८८ ॥

---

१ मृत्युत्व (अ). २ झांकले (क).

**अनुभूतोऽप्ययं लोको व्यवहारक्षमोऽपि सन् ।**
**असद्रूपो यथा स्वप्न उत्तरक्षणबाधतः ॥ ६४ ॥**

आणि व्यवहारी पाहतां जाण । अनुभवें देह मी ह्मणोन । इतर लोक हे प्रमाण । व्यवहार जाण सत्य वाटे ॥ ८९ ॥ जैसें स्वप्न मिथ्याभूत । स्वप्नीं सत्यत्वें बाधित । जागा न होय तंव सत्य । मिथ्याभूत जागृती ॥ ९० ॥

**स्वप्ने जागरितं नास्ति स्वप्नो जागरिते न हि ।**
**द्वयमेव लये नास्ति लयोऽपि ह्युभयोर्न हि ॥ ६५ ॥**

स्वप्नींचें जग स्वप्नी असे । जागृतीमाजी तो लोक नसे । स्वप्नीं जागृतिभान दिसे[1] । अनादिसें विचित्र ॥ ९१ ॥ स्वप्नभास जागृती नसे । जागृती तें स्वप्नीं न दिसे । दोहींचा भासही न भासे । पाहा कैसा सुषुप्ती ॥ ९२ ॥ आणि अवस्थाद्वयांत । सुषुप्ति नाही दिसत । अवस्थेंत अवस्था निरसत । मिथ्याभूत[2] तिन्हीही ॥ ९३ ॥

**यत्र ह्येवं भवेन्मिथ्या गुणत्रयविनिर्मितम् ।**
**अस्य द्रष्टा गुणातीतो नित्यो ह्येकश्चिदात्मकः ॥ ६६ ॥**

अवस्थेंत अवस्था निरसत । यालागीं तिन्ही मिथ्याभूत । गुणत्रयाचा निर्मित । देहीं भासत अभिमान ॥ ९४ ॥ स्थूळी जागृति विश्व अभिमान । अकार हाचि रजोगुण । सूक्ष्मीं स्वप्न तैजस खूण । उकारगुण सात्विक ॥ ९५ ॥ कारणीं सुषुप्ति प्राज्ञ । मकारमात्रा तमोगुण । हें गुणत्रयाचें निर्माण । मिथ्या जाण मृगजळप्राय ॥ ९६ ॥ यया दृश्यातें देखत । मिथ्या भास असें जाणत । आत्मा द्रष्टा गुणातीत । एक नित्य ज्ञानमय ॥ ९७ ॥ यया गुणें दृश्य भासे । आत्मयातें जीवित्व दिसे । जळीं बिंबपणे जैसे । रवि नसे आतळला ॥ ९८ ॥ हें तंव दृश्य मिथ्याभान । याचेनि आत्मया जीवपण । तेंही मिथ्या ऐसें जाण । आत्मा पूर्ण सदोदित ॥ ९९ ॥ सदोदित द्वैतमान । भासे परी नसे जाण । यदर्थी दृष्टांतवचन । आश्चर्य सर्वज्ञ देतसे ॥ १०० ॥

**यद्वन्मृदि घटभ्रान्तिः शुक्तौ वा रजतस्थितिः ।**
**तद्वद्ब्रह्मणि जीवत्वं वीक्षमाणेन नश्यति ॥ ६७ ॥**

जैशी मृत्तिका मृत्तिकापणें । भ्रममात्र घट ह्मणणें । घट ह्मणतां मृत्तिका असणें । घट भासणें मिथ्याभूत ॥ १ ॥ कीं शिंपी जैशी शिंपीपणें । भ्रम[3]मात्र रुपें ह्मणणें । रुपें ह्मणतां शिंपी असणें । परी मिथ्या ॥ २ ॥ तैसें ब्रह्म परिपूर्ण । अपर सदोदित आपण । तया नसतें जीवपण । पाहों जाणें तेव्हां[4] नसे ॥ ३ ॥

**यथा मृदि घटो नाम कनके कुण्डलाभिधा ।**
**शुक्तौ हि रजतभ्रान्तिर्जीवशब्दस्तथा परे ॥ ६८ ॥**

---

१ नसे. ( अ. ) २ मिथ्या बाधित येणेंचि त्रयें. ( अ ). ३ भ्रमभाव ( क ). ४ पाहे तंव जाण नसेचि. (क).

घट नाम मिथ्या मृत्तिकेसि । कुंडलत्व मिथ्या कनकासि । रुपें नाम शिंपीसि । मिथ्या ऐसें वदती ॥ ४ ॥ जीव हा शब्द तैसा जाण । सिद्ध परमात्मा परिपूर्ण । तयासि मिथ्या जीवपण । नसतें भान अति मिथ्या ॥ ५ ॥

**यथैव व्योम्नि नीलत्वं यथा नीरं मरुस्थले ।**
**पुरुषत्वं यथा स्थाणौ तद्वद्विश्वं चिदात्मनि ॥ ६९ ॥**

वर्णव्यक्ति व्योमा नसे । तया नाथिली नीलिमा दिसे । किरणीं मृगजळ जैसें । खुंट भासे पुरुषत्वें ॥ ६ ॥ तैसें हें विश्वभान । नसोनि भासे मिथ्या जाण । परमात्मा ज्ञानघन । परिपूर्ण स्वयें असे ॥ ७ ॥

**यथैव शून्यवेतालो गंधर्वाणां पुरं यथा ।**
**यथाऽऽकाशे द्विचंद्रत्वं तद्वत्सत्ये जगत्स्थितिः ॥ ७० ॥**

शून्य अंधारीं जैसें । भ्रमें वेताळ भूत ऐसें । कीं गंधर्वनगर दिसे । द्विचंद्र भासे तिमिरें पैं ॥ ८ ॥ सत्यस्वरूपीं तैसें जाण । नसोनि भासे जगत्व जाण । स्वयें परमात्मा पूर्णघन । जगभान असोनि नसे ॥ ९ ॥

**यथा तरङ्गकल्लोलैर्जलमेव स्फुरत्यलम् ।**
**पात्ररूपेण ताम्रं हि ब्रह्माण्डादौ तथाऽऽत्मता ॥ ७१ ॥**

जैसें तरंग आणि कल्लोळ । भासतां स्फुरे जळत्वें जळ । पात्ररूपें दिसे मेळ । परी केवळ तांबेंचि ॥ १० ॥ तैसा भासे ब्रह्मांडगोळ । विचित्र सृष्टी जगपाल्हाळ । परी परमात्माचि केवळ । जैसें मृगजळ उष्णचि ॥ ११ ॥

**घटनाम्ना यथा पृथ्वी पटनाम्ना हि तंतवः ।**
**जगन्नाम्ना चिदाभाति ज्ञेयं तत्तदभावतः ॥ ७२ ॥**

घट ऐसें नाम पाहतां । सिद्ध पृथ्वीच तत्वतां । पट ऐशी वदे वार्ता । निर्धारितां तंतूंचि ॥ १२ ॥ तैसें जग हें दिसे नाम । परी स्वयें आत्माराम । ज्ञानघन पूर्णब्रह्म । जाण तें परम तद्भावें ॥ १३ ॥

**सर्वोऽपि व्यवहारस्तु ब्रह्मणः क्रियते जनैः ।**
**अज्ञानान्न विजानन्ति मृदेव हि घटादिकम् ॥ ७३ ॥**

सर्वही जितुका व्यवहार पाहें । तितुकी क्रिया ब्रह्मरूप आहे । अवघी जगक्रिया स्वयें । ब्रह्म होय परिपूर्ण ॥ १४ ॥ ह्मणोनि अकर्मचि कर्म । कर्मचि स्वयें अकर्म । हें जो जाणे निजवर्म । ब्रह्म तो परम सिद्धचि ॥ १५ ॥ आणि हे असोनि ब्रह्मस्थिति । भ्रमें न कळे जयाप्रति । विपरीत भावना भ्रांति । अज्ञान ह्मणती तयातें ॥ १६ ॥ ते भ्रांति मिथ्या असे । तेणें मिथ्याचि विपरीत दिसे । सूर्य उत्तरे आला नसे । परी भासे भ्रांतालें ॥ १७ ॥ भेदीं अभेद सज्ञानातें । अभेदीं भेद

१ ही ओंवी अ प्रतींत नाहीं. २पाणी. (क). ३. भासे. (अ.). ४.सूताचि. (क).

अज्ञानातें । भेद् मानिती घटातें । मृत्तिकाचि ते अभेद् ॥ १८ ॥ अज्ञानातें भेद् भासे । तरी तो काय सत्यत्वें वसे । अज्ञान तेंचि मिथ्या असे । भेद् दिसे तोही मिथ्या ॥ १९ ॥

**कार्यकारणता नित्यमास्ते घटमृदोर्यथा ।**
**तथैव श्रुतियुक्तिभ्यां प्रपंचब्रह्मणोरिह ॥ ७४ ॥**

कार्य मिथ्यात्वें भासत । कारणत्वें तें शाश्वत । तरंग दिसे कार्यत्वें । जळचि सत्य कारणत्वें ॥ २० ॥ घटाकार भासे नासे । कारण पृथ्वी सत्य असे । घटपणें जरी भासे । मृत्तिका वसे नित्यत्वें ॥ २१ ॥ ऐसें श्रुति नाना युक्ति । प्रपंच ब्रह्माकार बोलती । प्रपंचत्व मिथ्या भ्रांति । ब्रह्मप्रतीति प्रपंचीं ॥ २२ ॥

**गृह्यमाणे घटे यद्वन्मृत्तिका भाति वै बलात् ।**
**वीक्ष्यमाणे प्रपंचेऽपि ब्रह्मैवाभाति भासुरम् ॥ ७५ ॥**

घट घेऊं जातां बळें । मृत्तिका होय ऐसें कळे । पाहों जातां प्रपंचलीले । आहे सगळें परब्रह्म ॥ २३ ॥ जैसा भेंडा घेऊं जातां । मृत्तिकाचि ये हाता । कीं ताब्या हातीं धरितां । तांबें तत्वतां प्रगटचि ॥ २४ ॥ तैसा हा प्रपंचाकार । अनुभवें पाहतांचि ब्रह्माकार । जैसा मृगजळाकार । पाहतां विचार उष्ण तें ॥ २५ ॥

**सदैवात्मा विशुद्धोऽस्ति ह्यशुद्धो भाति वै सदा ।**
**यथैव द्विविधा रज्जुर्ज्ञानिनोऽज्ञानिनोऽनिशम् ॥ ७६ ॥**

सदोदित आत्मा विशुद्ध स्वयें । सज्ञाना येथें निःसंदेह । अशुद्ध भावना सदा वाहे । विपरीत पाहे अज्ञान ॥ २६ ॥ जैसा एकला दोर असे । जाणत्या नेणत्या द्विधा दिसे । दोर सत्य जाणत्या वसे । सर्प भासे अज्ञाना ॥ २७ ॥ सज्ञानातें ब्रह्म पूर्ण । असोनि नाहीं प्रपंचभान । अज्ञानातें विपरीत ज्ञान । प्रपंच जाण सत्यत्वें ॥ २८ ॥

**कुंभो यथा मृण्मयः स्यात्तद्वद्देहोऽपि चिन्मयः ।**
**आत्मानात्मविवेकोऽयं मुधैव क्रियते बुधैः ॥ ७७ ॥**

कुंभ जैसा मृत्तिकारूप । तैसा देह चिन्मयस्वरूप । अवघे भेंडे पृथ्वीरूप । स्वस्वरूप जन सकळ ॥ २९ ॥ आत्मानात्मविभाग । वायां पंडित करिती सांग । ज्ञानिये स्वयेंचि निजांगें । देखती जग जगदात्मा ॥ ३० ॥ आत्मा अवघाचि परिपूर्ण । देह एकदेशी परिच्छिन्न । यालागीं देहायेव्हडेपण । न घडे जाण आत्मया ॥ ३१ ॥ पूर्णत्व सांडूनियां पाहें । अज्ञान आत्मया म्हणती देह । त्यांतें करूनि निःसंदेह । आचार्य स्वयें श्लोकार्थें ॥ ३२ ॥

---

१ नेणती. ( अ ). २ मिथ्या दिसत. ( क ). ३ स्वरूप. ( अ ).
४. पाहतां ब्रह्मचि थोर. ( अ )

**सर्पत्वेन यथा रज्जू रजतत्वेन शुक्तिका ।**
**विनिर्णीता विमूढेन देहत्वेन तथाऽऽत्मता ॥ ७८ ॥**

जैसा दोरु तैसाचि असे । मूर्खा सर्प ऐसा दिसे । शिंपी शिंपीपणें वसे । मूर्खा भासे रुपें ऐसें ॥ ३३ ॥ ऐसा निर्णयो मूढमति । आत्मया देहत्वें मानिती । पूर्णा परिच्छिन्न ह्मणती । विपरीत भ्रांति मूढातें ॥ ३४ ॥

**घटत्वेन यथा पृथ्वी पटत्वेन हि तन्तवः ।**
**विनिर्णीता विमूढेन देहत्वेन तथाऽऽत्मता ॥ ७९ ॥**

जैसें पृथ्वीचें पृथ्वीपण । नेणोनि मूर्खी विपरीत ज्ञान । घटत्व मानूनि प्रमाण । तन्तु नेणानि पट ह्मणती ॥ ३५ ॥ ऐसा निर्णयो मूढपणें । पूर्णासि परिमित करणें । पूर्ण आत्मा देहपणें । मूढी भावणें मूढमती ॥ ३६ ॥

**कनकं कुण्डलत्वेन तरङ्गत्वेन वै जलम् ।**
**विनिर्णीता विमूढेन देहत्वेन तथाऽऽत्मता ॥ ८० ॥**

सोनें सोनेंपणें साचार । मूढी नेणोनि विचार । कुंडलें मानिती साचोकार । सुवर्ण सार हे नेणती ॥ ३७ ॥ संचलें जळ जळत्वें असे । नेणोन मूर्खा विपरीत दिसे । तरंगपणें मानीतसे । उदकचि असे हें नेणे ॥ ३८ ॥ तैसा निर्णयो मूढ जन । पूर्ण आत्मयातें नेणून । मानी देहा येव्हडेपणें । आत्मा असोनि ह्मणे मी देह ॥ ३९ ॥

**पुरुषत्वेन वै स्थाणुर्जलत्वेन मरीचिका ।**[1]
**विनिर्णीता विमूढेन देहत्वेन तथाऽऽत्मता ॥ ८१ ॥**

मार्गी खुंट खुंटपणें । नेणोनि विपरीत देखणें । चोरबुद्धी शंख करणें । मूर्खी होणें हिंपुटी ॥ ४० ॥ की नेणोनि मृगजळविकार । ह्मणे आला महापूर । मूढी निर्णयो अविचार । केला थोर भवभ्रमें ॥ ४१ ॥ तैसा आत्मा परिपूर्ण । नेणोनियां मूढजन । देहत्वें मानिलें प्रमाण । धरिला अभिमान सत्यत्वें ॥ ४२ ॥

**गृहत्वेन हि काष्ठानि खड्गत्वेन हि लोहता ।**
**विनिर्णीता विमूढेन देहत्वेन तथाऽऽत्मता ॥ ८२ ॥**

काष्ठाचें नाही ज्ञान । घरचि ह्मणे हे प्रमाण । कीं लोह साचार नेणोन । शस्त्र आपण सत्य ह्मणे ॥ ४३ ॥ तैसा निर्णयो मूढजन । निजात्मा नेणोनि पूर्ण । देहातें आत्मत्व मानून । मूढ निमग्न अज्ञानी ॥ ४४ ॥ अज्ञानयोगें विपरीत । पूर्णा प्रमित मानित । तेचि ते अज्ञान भ्रांत । आचार्य सांगत दृष्टांतीं ॥ ४५ ॥

**यथा वृक्षविपर्यासो जलाद्भवति कर्हिचित् ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ८३ ॥**

---

१ पुरुषत्वें यथा. (क). २ क प्रतींत या ओवीचा तिसरा चरण पहिला असून, पहिला व दुसरा हे चरण अनुक्रमें दुसरा व तिसरा असे आहेत.

जैसा वृक्ष विपरीत । जळयोगें भासत । नीटचि उफराटा दिसत । पाहे जळांत तयातें ॥ ४६ ॥ तैसा आत्मा पूर्णपणीं । असोनि देहत्वें देहाभिमानी । अज्ञानयोगें-करूनि । मानिती मीपणीं देहातें ॥ ४७ ॥

**पोतेन गच्छतः पुंसः सर्वं भाति विचंचलम् ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ८४ ॥**

गंगेमाजी नावेआंत । बैसोनि जे पुरुष जात । उभय तीरीं त्यां दिसत । वृक्ष डोंगर धावती ॥ ४८ ॥ तैसें आत्मया देहत्व । अज्ञानयोगें पाहती भ्रांत । विपरीत भाव नाशिवंत । देहत्व मानी पूर्णत्वें ॥ ४९ ॥

**पीतत्वं हि यथा शुभ्रे दोषाद्भवति कस्यचित् ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ८५ ॥**

शुभ्रचि जैसें पिंवळें दिसे । ज्याचिये दृष्टी रोग असे । तया रोगें अनारिसें । सुपरीत भासे विपरीत ॥ ५० ॥ तैसें आत्मया देहत्व । अज्ञानयोगें पाहत । अज्ञानें भुलले भ्रांत । भावना विपरीत देहात्मता ॥ ५१ ॥

**चक्षुर्भ्यां भ्रमशीलाभ्यां सर्वं भाति भ्रमात्मकम् ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ८६ ॥**

ज्याचिये अंगीं भ्रमु असे । त्याचिया डोळां विपरीत दिसे । भ्रमरूप सकळ ऐसें । प्रतीत भासे नसतेंचि[2] ॥ ५२ ॥ अज्ञानयोगें तसे भ्रांत । आत्मयातें देहत्वें पाहत । सत्य तें केलें असत्य । असत्य तें सत्य मानिलें ॥ ५३ ॥ एकीं अनेक विपरीत-भान । हें तंव भ्रमाचें विंदान । अनेकीं एकचि प्रमाण । तो सज्ञान सुखरूप ॥५४॥

**अलातभ्रमणेनैव वर्तुलं भाति सूर्यवत् ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ८७ ॥**

कोलीत भोंवडितां जैसें । सूर्या ऐसें वर्तुळ दिसे । भ्रांता तैसें भ्रांतिवशें । अभेद दिसे भेदात्मक ॥ ५५ ॥ तेविं आत्मया देहपणें । मूढीं प्रमाण मानणें । अज्ञानयोगें पाहे ह्मणे । जन्मलों मरणें मज आहे ॥ ५६ ॥

**महत्त्वं सर्ववस्तूनां[3] सूक्ष्मत्वमतिदूरतः ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ८८ ॥**

थोर थोर वस्तु ज्या असती । दुरूनि पाहतां लहान दिसती । घोडे उंट आणि हस्ती दुरूनि दिसती अणु ऐसे ॥ ५७ ॥ तैसें नाहीं आत्मज्ञान । देहबुद्धि विपरीत ज्ञान । अज्ञानयोगें अज्ञान । ह्मणे मी सज्ञान देहात्मता ॥ ५८ ॥

---

१ भातीव चंचलम्. ( क ).

२ भलतेंचि. ( अ ). ३ सर्ववस्तूनामणुत्वं ह्यतिदूरतः ( अ ).

**सूक्ष्मत्वं सर्वभावानां स्थूलत्वं चोपनेत्रतः ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ८९ ॥**

सूक्ष्म पदार्थ जे जे सकळ । लहान अक्षरादि बहळ । उपनेत्रयोगें स्थूळ । प्रतीति केवळ पाहतया ॥५९ ॥ तैसा आत्माराम पूर्ण । तया देहत्वें परिच्छिन्न। अज्ञानयोगें अज्ञान । पाहे मीपण देहासि ॥ ६० ॥

**काचभूमौ जलत्वं वा जलभूमौ हि काचता ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ९० ॥**

कांचभूमी कांचचि असे । मूढा जळ ऐसें दिसे । जळभूमी कांचचि ऐसें । साच भासे नेणतया ॥ ६१ ॥ तैसा असोनि आत्माराम । सदोदित परब्रह्म । अज्ञानयोगें भ्रांता भ्रम । देहत्वधर्म आत्मया ॥ ६२ ॥

**यद्वदग्नौ मणित्वं हि मणौ वा वह्निता पुमान् ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥९१॥**

मणीं अग्नि पडला असे । नेणतां हिरा ऐसा दिसे । कीं हिराचि अग्नि ऐसें । नेणोनि भासे पुरुषातें ॥ ६३ ॥ तैसा आत्मा अविकार । एक पूर्ण परमेश्वर । त्यातें पाहे देहाकार । अज्ञान नर अज्ञानें ॥ ६४ ॥

**यथैव दिग्विपर्यासो मोहाद्भवति कस्यचित् ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ९२ ॥**

दिशाभुली जाहलियाप्रति । दिशा विपरीत दिसती । उत्तरे दक्षिण ह्मणती । पश्चिमे मानिती पूर्वचि ॥ ६५ ॥ यया भ्रमें धांविन्नले । कितेक आव्हाटा पडले । जन्ममरणें निर्बुजले । न कळे गुतले अभिमानें ॥ ६६ ॥ तैसे अज्ञानयोगें अज्ञान । आत्मया पाहती देहपणें । मिथ्या भ्रमाचें विंदान। पूर्णा परिच्छिन्न मानिती ॥ ६७ ॥

**अभ्रेषु सत्सु धावत्सु सोमो धावति भाति वै ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ९३ ॥**

अंतराळीं आभाळ धांवत । बाळें ह्मणती चंद्रमा पळत । अभ्रे पश्चिमेसि जात । चंद्रमा दिसे पूर्वे जातां ॥ ६८ ॥ तैसें आत्मया देहत्व जाण । पाहती अज्ञानयोगें अज्ञान । देहइंद्रियक्रियाचरण । मानिले पूर्ण आत्मधर्म ॥ ६९ ॥

**यथा शशी जले भाति चञ्चलत्वेन कस्यचित् ।**
**तद्वदात्मनि देहत्वं पश्यन्त्यज्ञानयोगतः ॥ ९४ ॥**

चंद्र गगनींचा गगनीं असे । जळीं चंचळ निश्चळ भासे । नेणे त्या जळीं सत्य दिसे । परी तो नसे आतळला ॥ ७० ॥ तैसें अज्ञानयोगें नर । मानिती आत्मया देहाकार । निर्विकारातें सविकार । भ्रांत पामर मानिती ॥ ७१ ॥ एवं आत्मस्थिति नेणोन । देहाभ्यासें मूढ जन । जन्मासवें भोगी मरण । आचार्य आपण सांगतु॥७२॥

**एवमात्मन्यविज्ञाते देहाध्यासो हि जायते ।**
**स एवात्मपरिज्ञानाल्लीयते च परात्मनि ॥ ९५ ॥**

एवं आत्मा अविनाश । नेणोनि जाहला देहाध्यास । तोचि तो आला फळास । जन्ममृत्यास कारण ॥ ७३ ॥ जड अचेतन अज्ञान । त्या देहासि मीपण । धरूनि विपरीत अज्ञान । जन्ममरणसंकल्पु ॥ ७४ ॥ दृढ देहाचें मीपण । नांवरूपाचा अभिमान । वर्णाश्रमें थोराऊन । अहंता पूर्ण बळावली ॥ ७५ ॥ देहीं बळावला अहंकारु । तेणें वृत्तीसि जाहला पसरु । वासना वाढली अपारु । विषयाकार निजध्यास ॥ ७६ ॥ हेचि गीतेआंत । अर्जुनास सांगे अनंत । द्विये श्लोकें तेही मात । परिसा सुचित्त सावध ॥ ७७ ॥

**ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।**
**सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ॥ ९६ ॥**

पुरुषें विषयो चिंतितां । वासनासंगें तो तत्वता । जाला काम प्रबळता । विषयार्थी लुब्धु ॥ ७८ ॥ काळ भुकेला तयापरी । खवळला काम विषयावरी । विषयसेवनें नानापरी । अधिक पसरी मुखातें ॥ ७९ ॥ जो विषय उणा होय । प्राप्त न होय कीं हातींचा जाय । तेथें क्रोध उभा ठाय । कृतांत होय खवळला ॥ ८० ॥ मणगटें तोडी खाय दांत । आपुलाही आपण करी घात । कीं परातें मारी खाणें खात । आवेश अद्भुत अनिवार ॥ ८१ ॥ क्रोधें शून्यत्वीं पडत । स्तब्ध मोहें घडे भ्रांत । ज्ञानस्फूर्ति मावळत । अधःपात तेणें घडे ॥ ८२ ॥ स्वर्गनरक यातायाती । नानादुःखें जन्मपंक्ति । पुनःपुन्हा आदळती । नव्हे कल्पांतीं निर्गमु ॥ ८३ ॥ चौऱ्यायशीं लक्ष योनी आंत । जन्ममरणाचे आवर्त । दुःखें भोगित असंख्यात । शास्त्रीं गणित न करवे ॥ ८४ ॥ ऐसा अपारु संसार । संसारीं संसारी जाले नर । नाना देह खर सूकर । व्याघ्र वानर ससे मासे ॥ ८५ ॥ एकाचे एक विषय । एकाचें एका महाभय। संसारीं प्राणी दुःखमय । महामोहें पडियेला ॥ ८६ ॥

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ ९७ ॥**

देवाची गुणमयी माया । वाढवी गुणविकार कार्या । कृष्ण ह्मणे धनंजया । माझी माया दुस्तर ॥ ८७ ॥ माया तरे ऐसा बळी । कोण्ही नसे भूमंडळीं। सुर नर मायाजाळीं । पडले गोंधळीं भ्रमाचे ॥ ८८ ॥ श्रीकृष्ण ह्मणे माझी माया । मज शरण नाहीं तया । अति दुस्तर तरावया । बुडवावया बळिवंत ॥ ८९ ॥ येथें मज शरण आले । माझे होऊनि मज भजले । मायामोहो तेचि तरले । मजही केलें वश तिहीं॥ ९०॥

दुर्लभ नरदेह पावून । जो श्रीकृष्णीं अनन्यशरण । कृष्णाचा होऊन आपण । कृष्णभजनीं प्रीति करी ॥ ९१ ॥ अखंड करी श्रीकृष्णस्मरण । श्रीकृष्णचरणीं विकिलें मन । श्रीकृष्ण आज्ञा स्वधर्माचरण । श्रीकृष्णस्मरण अहर्निशी ॥ ९२ ॥ श्रीकृष्णकृपें तया पोटीं । निर्मळ वैराग्य विवेकेसीं उठी । शम दम उपरति मिठी । तितिक्षा गोमटी मुमुक्षा होय ॥ ९३ ॥ त्यासि निगम श्रीकृष्णवचन । श्रीकृष्ण गुरु त्या आपण । वचनीं विश्वास दृढीकरण । श्रद्धाळू अनन्य श्रीकृष्णकृपें ॥ ९४ ॥ श्रीकृष्णकृपें ज्ञानसिद्धि । बुद्धि जडे निजात्मबोधीं । जोडे सुखस्वानंदनिधि । आचार्य बोधी श्लोकार्धें ॥ ९५ ॥

**स एवात्मपरिज्ञानाल्लीयते परमात्मनि ॥**

त्यासि गुरुकृपा परिपूर्ण । परमात्मस्वरूपाचें[1] ज्ञान । आत्माराम ज्ञानघन । तोचि आपण स्वतः सिद्ध ॥ ९६ ॥[2] परमात्मस्थिति अनुसंधान । ध्येय ध्याता नुगेनि भिन्न । तोचि करी निजध्यासन । आपआपण स्वतः सिद्ध ॥ ९७ ॥ सांडुनियां देहाभिमान । सोहं ब्रह्म ज्ञानघन । हेंचि धरिलें अनुसंधान । अहंता निमग्न यापरी ॥ ९८ ॥ पदार्थरूप अनुसंधान । चित्तें सांडुनियां आपण । स्वयें सिद्ध चैतन्यघन । पूर्णत्वें पूर्ण चिद्व्योम ॥ ९९ ॥ देहीहूनि परतली बुद्धि । जाहली आत्मनिश्चयें सिद्धि । धारणा निश्चळ निरवधि । सम समाधि सहजपणें ॥ १०० ॥ संकल्पविकल्पेंविण । मन स्वरूपीं निमग्न । जैसें वायूचें चळण । राहतां गगन गगनपणें ॥ १ ॥ कोंदलें पूर्ण निजात्मज्ञान । अंतःकरणाचें हेतुस्फुरण । विरोनि जाय ज्ञानघन । चिद्गगन शून्यरहित ॥ २ ॥ जैसें कल्पांतींचें जीवन । जळ स्थळ अवघें गिळून । कोंदलें आपणाचि आपण । जन वन नुरेचि ॥ ३ ॥ सहज जैसें जीवनीं जीवन । कीं पूर्ण गगनीं गगन । स्वादीं जैसें स्वादपण । नादीं नादपण सहजचि ॥ ४ ॥ तैशी सिद्धस्वरूपस्थिति । पूर्ण सहज[3] आइति । ज्ञानिये गुरुकृपें पावती । अहंकृति नाठवे ॥ ५ ॥ ऐशी सिद्धस्वानंदता । गुरुकृपें निजभक्ता । अभेदभजनें तत्वता । निष्ठावंता स्वतःसिद्ध ॥ ६ ॥ चकोरा चंद्रीं अनुसंधान । तया घडे अमृतपान । निष्ठावंता समाधान । स्वानंद पूर्ण सदोदित ॥ ७ ॥ परी मी एक ज्ञाता श्रेष्ठ । मी निजध्यासनिष्ठ । ऐसा अभिमान तो भ्रष्ट । पाषांडी धीट ज्ञानगर्वें ॥ ८ ॥ असो आतां तीं लक्षणें । गुरुकृपा समाधान । गुरुकृपेमाजी असणें । असणें नसणें सांडूनि ॥ ९ ॥ कृष्णदास जयराम ह्मणे । बहु व्युत्पत्ति बोलों नेणें । मज नुरवूनि मीपण । स्वयें श्रीकृष्ण श्रीकृष्णकथा ॥ १० ॥ इति

---

१ श्रीकृष्ण ज्ञान ( अ ). २ आत्माराम ज्ञानघन । तोचि अंतरीं समाधान । असे दुसरा व तिसरा चरण अ प्रतींत आहेत. ३ सिद्ध ( अ ).

श्रीअपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुखगौरव । अज्ञाननिवृत्ति ज्ञानानुभव । प्रकरण स्वयमेव सहावें ॥ २११ ॥

ॐनमो सद्गुरु चित्समुद्रा । स्वानंदजीवना पूर्ण गंभीरा । परतल्या वृत्तिसरिता स्थिरा । सुखनिर्भरा निजऐक्य ॥ १ ॥ ऐक्य जाहालिया सरली धांव । खुंटली जाणिवेची हांव । जीव शिव बुडालें नांव । तुझा तूं स्वयमेव एकला ॥ २ ॥ एकला तूं सदोदित । जैसा जाहलिया कल्पांत । पिंड ब्रह्मांड नुरे मात । तुझा तूं अनंत एकला ॥ ३ ॥

**किं करोमि क्व गच्छामि किं गृह्णामि सृजामि च ।**
**आत्मानं पुरतः सर्वं महाकल्पाम्बुना यथा ॥ ९८ ॥**

तुझी कृपा कल्पांत संभवे । शिष्य सद्[2]वृत्ति सद्भावे । दुजें कांहींच नाठवे । मीपण अनुभवें बुडालें ॥ ४ ॥ यथें काय कराव कोठें जावें । काय घ्यावें आणि काय त्यजावें । अहंकर्तृत्व नाठवे । ब्रह्मानुभवें गिळियेलें ॥ ५ ॥ जैसा तरंग उठतां पाहे । सर्वेचि पाणी व्यापून राहे । तैसें कर्तृत्व मात्र दिसताहे । गिळूनि ठाये ब्रह्मानुभवें ॥ ६ ॥ महाकल्पांतीचें भरतें । गिळूनि ठाके स्थळाजळांते । तैसें गुरुकृपें ज्ञानियातें । उरी अहंतेतें उरेना ॥ ७ ॥ देह प्रारब्धें वर्णाश्रमीं । वर्ततां दिसे स्वधर्मकर्मी । ज्ञाता अलिप्त तये भ्रमीं । सुखदुःखें[3]भ्रमीं ढळेना ॥८ ॥ ज्ञानिया नाहीं देहभ्रम । प्रारब्ध नाहीं त्रिविधकर्म । गुरुकृपें आत्माराम । पूर्णब्रह्म सदोदित ॥ ९ ॥ बाप सद्गुरु चित्सागर । पूर्णपूर्णत्वें उदार । जयाचे महिमे नाहीं पार । हरिहर किंकर स्तविताती ॥१०॥ चित्सागर सद्गुरुमूर्ति । कन्[4]या लक्ष्मी स्वरूपस्थिति । देतां हरिभक्ताप्रति । नारायण होती स्वतः सिद्ध ॥ ११ ॥ ते नरोत्तम नारायण । समाधिशेषशयनीं आपण । सुखें सुखरूप परिस्फुरण । रमारमण अनंत ॥१२॥ सद्गुरुकृ[5]पा सुखसागर आपण । ज्याचे कृपातटीं संपूर्ण । ज्ञानी अनंत रामायण । सुखी सज्जन स्वानंदें॥१३॥ सद्गुरुकृपा निजात्मज्ञान । जाहलें जया निज निर्वाण । श्रीशंकराचार्य आपण । सांगे कृपेनें त्याची स्थिति ॥ १४ ॥

**सर्वमात्मतया ज्ञातं जगत्स्थावरजंगमम् ।**
**अभावात्सर्वभावानां देहानां चात्मता कुतः ॥ ९९ ॥**

सर्व आत्मा भेदशून्य । निखळ अद्वैत चिद्घन । सदोदित चिद्गगन । पूर्णत्वें पूर्ण संचला ॥ १५ ॥ ऐसें जाहालिया निजात्मज्ञान । स्थावर जंगमादि जगद्भान । ये भावनेअभाव जाण । विवर्तदर्शन अतिमिथ्या ॥ १६ ॥ तेथें मी देह येव्हढा परिच्छिन्न । उरे देहात्मता कोठून । आत्मा मी ब्रह्म पूर्ण । न म्हणतां आपण स्वतः

---

१ भद्रा ( अ ). २ वृत्तीसीं स्वभावें ( अ ). ३ सुखदुःखाश्रमीं ( क ).
४ कन्यालक्षण ( अ ). ५ कृपा हा शब्द क प्रतींत नाहीं.

सिद्ध ॥ १७ ॥ ऐशी जाणोनि स्वरूपस्थिति । निष्ठे राहावें निश्चिती । शंकराचार्य कृपामूर्ति । सावध ह्मणती सच्छिष्या ॥ १८ ॥

**आत्मानं सततं ज्ञात्वा कालं नय महामते ।**
**प्रारब्धमखिलं भुञ्जन्नोद्वेगं कर्तुमर्हसि ॥ १०० ॥**

गुरु आचार्य आपण । ह्मणे गुरुदास हो सावधान । सतत हें आत्मत्व जाणोन । सार्थक जाण काळ कीजे ॥ १९ ॥ मिथ्या देहप्रारब्ध दिसे । तेथें मिथ्या सुखदुःख भासे । तेणेंसहित मिथ्या असे । आभासे जैसें गंधर्वनगर ॥ २० ॥ तें प्रारब्ध भोगितां पाहें। उद्वेग न करी सावध राहें । निजात्मस्थिति निजनिर्वाहें। संचली आहे तुझी तुज ॥२१॥ सुख येईल प्राग्ब्धें करीं । संतोष श्लाघ्यता तेथें न धरीं। दुःख येतां देहावरी। धारणा अंतरीं ढळों नेदी ।।२२॥ प्रारब्धें सुखदुःख लागतां । मनें मानी सुखदुःखता । आत्मारामीं निमग्न होतां । सुखदुःखव्यथा निरसती ॥ २३ ॥ ह्मणोनियां प्रारब्धभोगीं । अनुद्वेग राहे निजात्मयोगी । गळितपत्र वायोसंगीं । उडतां अंगीं न भान लागे ॥ २४ ॥ तूं तंव आत्माराम पाहीं । तुज देहप्रारब्ध नाहीं । स्वानंदमय ठायींच्या ठायीं। सावध राहीं अनुद्वेगें ॥ २५ ॥ येथें ऐसें आशंकिती । जन्हीं बाणली ज्ञानप्राप्ति । प्रारब्ध आहे ज्ञानियाप्रति । आचार्य निवृत्ति सांगत ॥ २६ ॥

**उत्पन्नेऽप्यात्मविज्ञाने प्रारब्धं नैव मुञ्चति ।**
**इति यच्छ्रूयते श्रुत्या तन्निराक्रियतेऽधुना ॥ १ ॥**

उत्पन्न जाहलें[1] जन्हीं विज्ञान । पावला पूर्ण समाधान । परी प्रारब्ध न सोडी जाण । ज्ञानिये आपण सुखदुःखी ॥ २७ ॥ ऐसें शास्त्रीं श्रवण करित । परी भ्रांता न कळे सिद्धार्थ । यालागीं आचार्य कृपावंत । शंका निरसित सिद्धार्थें ॥ २८ ॥ ज्ञानी आत्मा ब्रह्म पूर्ण । मिथ्या देहप्रारब्धभान । केविं आतळे त्याला गुण । सावधान परियेसा ॥ २९ ॥

**तत्त्वज्ञानोदयादूर्ध्वं प्रारब्धं नैव विद्यते ।**
**देहादीनामसत्त्वात्तु यथा स्वप्नो विबोधतः ॥ २ ॥**

जया परमतत्त्वाचें ज्ञान । उदय पावलें पूर्णपणें । आत्माराम तो परिपूर्ण । निर्वाण ज्ञान अनुभवे ॥ ३० ॥ त्यासि जाण प्रारब्ध नाहीं । आत्माराम तो विदेही । देहप्रारब्ध दिसे कांहीं । मिथ्या पाहीं तें अवघें ॥ ३१ ॥ जैसा स्वप्नींचा देहो स्वप्नांत । सत्य सुखदुःखेंसि दिसत। तेविं अज्ञानें देहासि सत्यत्व। प्रारब्ध भासत सत्यत्वें॥ ३२॥ तेथें जागृति जाहलिया पाहें । मिथ्या कल्पना निरसूनि जाय । पूर्वील राज्य सिद्ध आहे । दरिद्र जाय निरसोनी ॥ ३३ ॥ अनंत अपार परिपूर्ण । तया कैंचें प्रारब्धभान । स्पर्शला नाहीं जन्ममरण । सांगे श्रीकृष्ण श्रीगीते ॥ ३४ ॥

---

[1] जाहली ( अ ).

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ ३ ॥

जन्मला नाहीं त्या कैंचें मरण । स्वतःसिद्धासि करील कवण । अजन्मा शाश्वत पुरातन । देहधर्मेंवीण संचला ॥ ३५ ॥ मुळीं जो जाहलाचि[1] नाहीं । त्यासि मरण कैंचें काई । ह्मणऊनि प्रारब्ध कांहीं । ज्ञानिया पाहीं स्पर्शेना ॥ ३६ ॥

कर्म जन्मान्तरीयं यत्प्रारब्धमिति कीर्तितम् ।
न तु जन्मान्तराभावात्पुंसो नैवास्ति कर्हिचित् ॥ ४ ॥

कर्म जें जन्मांतरी केलें । त्या नांव प्रारब्ध बोलिलें । जन्मांतेंचि नाहीं देखिलें । प्रारब्ध बोलिलें कवणें तया ॥ ३७ ॥ त्या पुरुषा प्रारब्ध क्वचित । हें न घडे गा निश्चित । देहबुद्धि स्थापिती भ्रांत । स्वप्नींचें सत्य स्वप्नींचिया ॥ ३८ ॥

स्वप्ने देहो यथा ध्वस्तस्तथैवायं च देहकः ।
अध्यस्तस्य कुतो जन्म जन्माभावे हि तत्कुतः ॥ ५ ॥

स्वप्नीं देहाचा अध्यासु । धरिला तो माझा ह्मणे त्यास । परी देह तो नेणे तयास । यालागी पुरुषास देहत्व न घडे ॥ ३९ ॥ अध्यास भासे मिथ्याभूत । पुरुष देहातीत शाश्वत । मा तो कोठें जन्मा येत । नित्य शाश्वत अनादि ॥ ४० ॥ जेथें जन्माचाचि अभाव । प्रारब्धाचें कैचें नांव । गांव नसतां घडे शिंव । ह्मणे तो मानव भ्रमला कीं ॥ ४१ ॥ ह्मणोनि ज्ञानवंता पुरुषातें । प्रारब्ध सत्य न घडे त्यातें । श्रीशंकराचार्य वेदांतमतें । निश्चयातें सांगतु ॥ ४२ ॥

उपादानं प्रपंचस्य मृद्भांडस्येव पश्यति ।
अज्ञानं चेति वेदान्ते तस्मिन्नष्टे क्व सत्यता ॥ ६ ॥

जैसें मृत्तिकेचे भांडियास । मृत्तिकाचि कारण तयास । भांडीं तीं मृत्तिकेचा भास । भास नाश तेणेंसि ॥ ४३ ॥ तैसें या प्रपंचाचें कारण । असे मुख्यत्वें अज्ञान । नगरडोंगरीं दिसे भ्रमण । भोंवंडी जाण मूळ तया ॥ ४४ ॥ ते भोवंडी जेव्हां निरसे । तेव्हां कांहींच भोंवत नसे । तेवि अज्ञानाचेनि निरासें । कैंची भासे विश्वता ॥ ४५ ॥ विश्व देह आणि प्रारब्ध । अज्ञान सत्यत्वें सिद्ध । तें लंव अज्ञान गा सुघद्ध । आचार्य विशद सांगतु ॥ ४६ ॥

यथा रज्जुं परित्यज्य सर्पो गृह्णाति वै भ्रमात् ।
तद्वत्सत्यमविज्ञाय जगत्पश्यति मूढधीः ॥ ७ ॥

जैसा दोर दोरत्वें वसे । नेणोनि बुद्धीसि विपरीत दिसे । सर्प ह्मणोनियां कैसें । कांपत असे भ्रमेंकरूनि ॥ ४७ ॥ धांवा धांवा सर्प मारा । भार मंत्र करुनि धरा । डंखिलों होनों आजि[2] अवधारा । कन्याकुमरां भेटों धांवे ॥ ४८ ॥ तैसें सत्यस्वरू-

---

१ जन्मलाचि ( क ). २ जी ( क ).

पातें नेणोंनि । पाहे देहत्वें श्रमेंकरूनि । मूढबुद्धि निश्चयों मानीं । आपणा देहपणीं जगत्वें जगा ॥ ४९ ॥

**रज्जुरूपे परिज्ञाते सर्पखंडं न तिष्ठति ।**
**अधिष्ठाने तथा ज्ञाते प्रपंचः शून्यतां गतः ॥ ८ ॥**

आणि सर्प नव्हे तो दोर प्रमाण । ऐसें दोराचें जया ज्ञान । तया सर्प नाहीं निर्माण । सावधान स्वतःसिद्ध ॥ ५० ॥ तैसें प्रपंचाचें अधिष्ठान । तें स्वतःसिद्धचि आपण । प्रपंच भासे मिथ्याभान । निभ्रांत सज्ञान स्वस्वरूपीं ॥ ५१ ॥ दृश्य देह प्रपंच भान । हें तंव मिथ्याचि अवघें शून्य । ज्ञानी आत्माराम पूर्ण । प्रारब्ध जाण नाहीं तया ॥ ५२ ॥ यालागीं प्रपंच नाहीं जाण । देहप्रारब्ध कैंचें भान । तरी कां बोलिले श्रुतिवचन । आचार्य कृपेनें हें सांगे ॥ ५३ ॥

**देहस्यापि प्रपंचत्वात्प्रारब्धावस्थितिः कुतः ।**
**अज्ञानजनबोधोऽयं प्रारब्धं वक्ति वै श्रुतिः ॥ ९ ॥**

देहातें या प्रपंचातें । सत्यत्वचि नाहीं निरुतें । तेथें ठाव प्रारब्धातें । कोठें निरुतें ह्मा लाहे ॥ ५४ ॥ वांझेच्या पुत्राचा विवाह केला । मागुता घरभंग झाला । घडे सत्यत्व या बोला । तरी ज्ञानिया प्रारब्ध ॥ ५५ ॥ तरी हें सरें अज्ञानाप्रति । वाटताहे देहभ्रांति । त्यांसि बोधार्थ ह्मणे श्रुति । प्रारब्धगति अनिवार ॥ ५६ ॥ प्रारब्ध प्राणियां मुख्य अज्ञान । प्रारब्ध लिंगदेह जाण । प्रारब्ध स्थूलदेह मीपण । प्रपंचभान प्रारब्ध ॥ ५७ ॥ प्रारब्ध तें क्रियाचरण । पापपुण्य सुखदुःख गहन । स्वर्ग नरक बंध मोक्षण । प्रारब्ध जाण कर्म ह्मणिजे ॥ ५८ ॥ आणि जेथें अज्ञाननिवृत्ति । सिद्ध गुरुरूपें आत्मास्थिति । प्रपंच देह प्रारब्धगति । तया भ्रांति असेना ॥ ५९ ॥ हरिगुरुभक्ति प्रेमें करी । गुरुकृपा निजज्ञानें बरी । अज्ञानगांठी हृदयाभीतरीं । भेदली बरी निजबोधें ॥ ६० ॥ ते गांठीच्या पोटीं । होत्या संदेहाच्या कोटी । देह प्रारब्ध प्रपंच गोष्टी । सुबद्ध गांठी अज्ञान ॥ ६१ ॥ त्याचा बोलावा विस्तार । तरी किती उपसावा अंधकार । सूर्योदयीं नव्हे स्थिर । तैसा प्रकार गुरुकृपें ॥ ६२ ॥ ते अज्ञानग्रंथि निरासिली । तेव्हां विपरीत दृष्टी मावळली । देहप्रारब्ध ते अज्ञानभुली । अभाव झाली निश्चयेसीं ॥ ६३ ॥ यालागीं प्रारब्ध तें अज्ञानत्व । अहंकर्तृत्वें क्रियमाण संचित । ज्ञानी आत्माराम निश्चित । नाहीं देहत्व कर्मत्वें ॥ ६४ ॥ प्रारब्ध क्रियमाण संचित । हें कर्म अज्ञानें

---

१ जगत्वें ( क ). २ देह ह्मणती ( अ ). ३ हरिगुरुभक्ति प्रेमें करिती । सप्रेमता आत्मस्थिति । गुरुकृपें प्रारब्धगति । तया भ्रांती असेना ॥ ( अ ) ४ भ्रांतीच्या ( अ ). ५ दृष्टी ( क ). ६ मिथ्या ( क ).

भासत । ज्ञानी ब्रह्म सदोदित । अहंकर्तृत्व त्या नाहीं ॥ ६५ ॥ तेथें आशंका ऐशी असे । प्रत्यक्ष कर्म करितां दिसे । देह इंद्रियें क्रिया भासे । पाळीतसे विधीतें॥ ६६॥

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ ११० ॥**

जैसे आचरती श्रेष्ठ सज्जन । तेचि दीक्षे वर्तती जन । श्रेष्ठाची क्रिया ते प्रमाण । करिती आपण सर्वही ॥ ६७ ॥ ह्मणऊनि श्रेष्ठ ज्ञानी सज्जन । प्रत्यक्ष करिती स्वधर्माचरण । वसिष्ठादि ऋषि संपूर्ण । यागविधानें अनुष्ठानं ॥ ६८ ॥ यालागीं ज्ञानिया क्रियाचरण[1] । आहे ऐशी आशंका पूर्ण । ये आशंकेचें निरसन । श्रीकृष्ण-वचन हें ऐका ॥ ६९ ॥

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ॥ ११ ॥**

ह्या सर्व कर्मारंभातें । विधियुक्त आचरती ज्ञाते । फळकामना नातळत । ब्रह्मकर्मातें आचरिती ॥ ७० ॥ ब्रह्मकर्म ऐसें पाहीं । तरी हें कर्म मी कर्ता हें कांहीं । हा जयासि संकल्प नाही । ठायींच्या ठायीं ब्रह्ममय ॥ ७१ ॥ भडाग्निमाजी पाहें । तृण पडलिया जळोनि जाय । तैसा ज्ञानी[2] स्वये । गिळूनि ठाये कर्महेतु ॥ ७२ ॥ कर्म-कर्ता हें मीपण । मनें धरावें आपण । तंव तें मन ब्रह्मार्पण । सहज पूर्ण ब्रह्ममय ॥ ७३ ॥ ब्रह्मस्थिति असतां मन । इंद्रियें ब्रह्मरूप आपण। इंद्रियीं क्रिया जे प्रमाण। तें तें जाण ब्रह्मकर्म ॥ ७४ ॥ सज्ञानें दिसे कर्म केलें । परी तें कांहींच नाहीं जालें। मन ब्रह्माकार संचलें । कर्मत्व मोडलें ब्रह्मत्वें ॥ ७५ ॥ वेगळाल्या इंद्रियवृत्ति । वर्ततांही आपुल्या अर्थी । मन असतां स्वरूपस्थिति । सहज प्रतीति ब्रह्मकर्म ॥७६॥ ह्मणोनि कर्म तें नव्हे जाण । ज्ञानी निष्कर्म आत्मा पूर्ण । कर्मभ्रम नेणे आपण । सावधान आचार्य ह्मण ॥ ७७ ॥

**क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ।**
**बहुत्वं तन्निषेधार्थं श्रुत्या गीतं हि वै स्फुटम् ॥ १२ ॥**

कर्माचा क्षय निजज्ञानें । ज्ञानी आत्मा ब्रह्मपणें । परावर द्रष्टा दृश्येंविणें । नव्हे मीपणें विकारी ॥ ७८ ॥ नाना वृत्ति भेदभान । अज्ञानातें सत्यपण । त्याचें करावया निरोधन । प्रारब्धवचन बोले श्रुति ॥ ७९ ॥ अज्ञानातें श्रुति ह्मणे । जें कर्म करिसी मीपणें । तें तें लागेल रे भोगणें । प्रारब्ध-पण अनिवार ॥ ८० ॥ मी देह आणि हे जन । येणें भेदें बहुत भ्रमलें मनें । त्रिविधकर्म हें बंधन । प्रारब्ध क्रियमाण संचित ॥ ८१ ॥ येणें भोगिसी जन्ममरण।

---

१ आचरण ( अ ). २ ज्ञानाग्नि ( क ).

यालागीं रिघे गुरूसि शरस । कर्मत्रयाचें बंधन । तुटेल मीपण गुरुकृपें ॥ ८२ ॥ कर्म आचरे विधियुक्त । तें ज्ञानें क्रियमाण तुटत । ब्रह्मार्पण स्वयें होत । नव्हे संचित कर्माचें ॥ ८३ ॥ मिथ्या देहो जाणोनियां । प्रारब्धासारिखें भोगूनियां । उद्वेग न करी सखया । सद्गुरुपायांचेनि धर्में ॥ ८४ ॥ राहें सिद्ध आत्मस्थिति । तरी तू सहजपणें मुक्त । भ्रांति सांडोनि निवांत । राहे निश्चित स्वात्मसुखें ॥ ८५ ॥ ऐसा बोध अज्ञानाप्रति । होवया प्रारब्ध बोलती श्रुति । बहुवे भेद यांची निवृत्ति । केली युक्ति श्रुतिवचनें ॥ ८६ ॥ ऐसिया नानायुक्ति निर्धारें । निजात्मज्ञान बोधिलें खरें । श्रीशंकराचार्य उदारें । बोधिलें बरें रुपावंतें ॥ ८७ ॥ श्रीशंकराचार्य धूर्जटी । कृपें छेदिली अज्ञानगांठी । निजात्मज्ञान उठाउठी । केली भेटी स्वस्वरूपी ॥ ८८ ॥ छेदूनि सकळ अनुमान । केलें संशयांचें दहन । निःसंदेह निजात्मज्ञान । सावधान पैं केलें ॥ ८९ ॥ सद्गुरुरूपा निजात्मबोधी । ऐशी झाली ज्ञानसिद्धि । येथें सावध रहावया बुद्धि । मनन विधि करावा ॥ ९० ॥ जें जें जाले ज्ञानश्रवण । त्याचें करावें बरवें मनन । मननवीण केले श्रवण । न फळे जाण वांझपणें ॥ ९१ ॥ विवेक झाला श्रवणेंकरुनि । तो विवरावा मननें धरूनि । तरीच मन सावधपणी । निजात्मज्ञानीं दृढावे ॥ ९२ ॥ श्रवणें मननें दृढ निर्धार । ज्ञानामृत राहील स्थिर । तेणें निजध्यास निर्विकार । होईजे निर्भर स्वानंदु ॥ ९३ ॥ त्या निजध्यासाची स्थिति । सांगे आचार्य कृपामूर्ति । पुढें आठवे प्रकरणोक्ती । स्वानंदप्राप्ति सद्य फळ ॥ ९४ ॥ जेवीं स्वयपाक सिद्ध करणें । त्यावरि तृप्त भोजनें । कीं तपें राज्य पावणें । त्यावरी भोगणें राज्यसुख ॥ ९५ ॥ तेवि जाहलिया निजात्मज्ञान । बरवें करावें निजध्यासन । तेंचि आठवे प्रकरण । सावधान आचार्य ह्मणे ॥९६॥ भक्ती सज्जनीं सावधान । जोडले हें ज्ञाननिधान । बरवी निष्ठा निजध्यासन । भोगावा पूर्ण स्वानंदु ॥ ९७ ॥ ह्मणे कृष्णदास जयराम । माझा निजध्यास श्रीकृष्णनाम । येणें मनातें उपशमन । स्वानंदसंभ्रम स्वतःसिद्ध ॥ ९८ ॥ हें जें सत्य श्रीसद्गुरुनाम । तेथें नाहीं जीवत्व भ्रम । विद्या अविद्या उपरम । विश्रामधाम निजभक्तां ॥९९॥ श्रीकृष्ण नाम हें ब्रह्मपूर्ण । हें सिद्ध साध्य समाधान । तेथें नुरे मीतूंपण । निजभक्त खुण जाणती ॥ १०० ॥ इतिश्री अपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुखगौरव । प्रारब्धनिवृत्तिनिजानुभव । प्रकरण स्वयमेव सातवें ॥ १०१ ॥

ॐ नमो सद्गुरुचिद्गगना । निरावकाशा परिपूर्णा । अद्वय शांता श्रीकृष्णा । नमन चरणा दुजेवीण ॥ १ ॥ स्वामी तुज करितां नमन । लीन होय मनपवन । न भासे माझें मीपण । तूंपणेंवीण तूंचि तूं ॥ २ ॥ भासे नासे अभ्रचिन्ह । सबाह्य

असतां अलिप्त गगन । भासतां नासतां मायिक जन । तुझा तूं पूर्ण एकला ॥ ३ ॥ वांझेचे सुने नातू झाला । तो मृगजळीं बुडोनि मेला । घडे सत्यत्व या बोला । तरी मायिकाला सत्यत्व ॥ ४ ॥ सत्य नाहीं तें भासलें । आणि सर्वेचि नासलें । जैसें बागुलाचें पिलें । जालें मेलें मिथ्यत्वें ॥ ५ ॥ तैसें करितां तुज नमन । न भासे माझें मीपण । तेथें कैंचें जगद्भान । सहज पूर्ण तूंचि तूं ॥ ६ ॥ जैसें वायोचें चळण । नसतां गगनीं सहज गगन । तेविं मीतूंपणेंविण । तूंचि पूर्ण एकला ॥ ७ ॥ जेथें दृश्य द्रष्टा दर्शन । ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान । जन्मलें नाहीं मुळींहून । जन्मेल आपण हेंही न घडे ॥ ८ ॥ ऐशी निर्वाण स्वरूपस्थिति । सर्वज्ञ ज्ञानिया पूर्ण प्रतीति । आइती सिद्धचि संवित्ति । सहज स्थिति गुरुभक्तां ॥ ९ ॥ गुरुभक्त ते परमानद । अद्वय सिद्धचि स्वानंद । अद्वयभजनें घनानंद । परम अगाध सुखमय ॥ १० ॥ हे अखंड निजात्म संवित्ति । साधका कैसेनि पूर्णप्राप्ति । श्रीशंकराचार्य कृपामूर्ति । सावधान ह्मणती गुरुभक्तां ॥ ११ ॥ हे जे अगाध ब्रह्मस्थिति । शुकासनकादिकांची प्रतीति । अधिकारियातें पूर्ण प्राप्ति । अभक्ता हातीं नातुडे ॥ १२ ॥ हरिगुरुभजनीं नाहीं प्रेम । तयासि कैंचा हा सुखसंभ्रम । शब्दज्ञानें चढे भ्रम । न कळे वर्म प्राप्तीचें ॥ १३ ॥ सद्गुरु माझा ब्रह्म पूर्ण । त्या सद्भावें अनन्य शरण । काया वाचा विकिलें मन । त्यास संपूर्ण सुखसिद्धि ॥ १४ ॥ हें निरोपण तयांप्रति । त्यांसिच घडे पूर्णप्राप्ति । गुरुचरणीं अनन्य असती । त्यांतें निश्चिती निष्ठा घडे ॥ १५ ॥ श्रवण मनन निजध्यास । प्रेमळा घडे सावकाश । ह्मणे जयराम कृष्ण दास । कृष्णसखास कृष्णभक्ति ॥ १६ ॥ श्रीकृष्णभक्ति जया आवडे । त्यासिच श्रवणीं फळ जाडे । मनन घडे त्या रोकडें । लागे धडफुडें मन ध्यासीं ॥ १७ ॥ निजध्यास आत्मस्थिति । नसतां कैंची सुखप्राप्ति । स्वानंदसुखातें भोगिती । जाण निश्चिती निजध्यासी ॥ १८ ॥ श्रवणमननाचें फळ । जाण निजध्यास केवळ । सुख स्वानंद प्रबळ । होय निश्चळ निजध्यासे ॥ १९ ॥ नाहीं सुख पृथ्वीपतीतें । नाहीं सुख देवराजातें । तें सुख विरक्तातें । मनि एकांतें भोगिती ॥ २० ॥ मुनि ह्मणजे मननशील । मन ज्याचें अचंचल । निजध्यासी निज निर्मळ । स्वानंद प्रबळ भोगिती ॥ २१ ॥ न करूनियां निजध्यास । शब्दज्ञान बहुवस । भोगावया विषयांस । वरी वेश शाब्दिक ॥ २२ ॥ घरोघरीं पुस्तकभार । शिकोनि ज्ञाते झाले फार । लोकप्रतिष्ठा पडिभर । शिश्नोदरपरायण ॥ २३ ॥ मठोमठीं तापसजन । महंती धरूनि अभिमान । वरी वेश संपादून । वृत्ति निमग्न विषयरसीं ॥ २४ ॥ पुरीं पाठणीं वेदविद । विप्र आहेत प्रसिद्ध । विषयालागीं शास्त्रबोध । परी स्वानंद

१ गुरुवचनीं (अ). २ भजन (अ). ३ निजध्यासें (क). ४ ही ओवी क प्रतींत नाहीं. ५ यापरी स्वानंद साधिती (अ).

न साधिती ॥ २५ ॥ परी परम तत्त्वाचें चिंतन । न करून भुलले मूर्खजन । सिद्ध स्वानंद परिपूर्ण । भक्ति न करोनि विषयीं रत॥ २६ ॥ येथें धन्य धन्य ते हरिभक्त । विषयीं उदास विरक्त । श्रवणमननयुक्त । निजध्यास करिती सर्वदां ॥ २७ ॥ श्रवणमननाचें फळ । जाण निजध्यास केवळ । स्वानंदसुखाचा सुकाळ । होय प्रबळ निजध्यासें ॥ २८ ॥ निजध्यासी अनन्यभक्त । निजध्यासी शुद्ध विरक्त । निजध्यासेंविण अभक्त । विषयासक्त ज्ञानगर्वी ॥ २९ ॥ निजध्यासी एक ज्ञानी पूर्ण । ब्रह्मनिष्ठ परम पावन । श्रीशंकराचार्य आपण । सांगे कृपेनें निजध्यास॥३०॥

**त्रिपंचांगान्यथो वक्ष्ये पूर्वोक्तस्य हि लब्धये ।**
**तैश्च सर्वैः सदा कार्यं निदिध्यासनमेव तु ॥ १३ ॥**

ते निजस्थिति सांगोपांगें । बोलिजेती पंधरा अंगें । हे रत्नमाळा निजांगें । मिरवे निजयोगें योगियों[2] ॥ ३१ ॥ हे रत्नमाळा जयाचे कंठीं । तोचि सदाशिव धूर्जटी । तोचि श्रीकृष्ण जगजेठी । योगियां मुगुटीं मुगुटमणि ॥ ३२ ॥ हे रत्नमाळा नाहीं गळां । आणि शब्दज्ञानें जो आगळा । तो कावाडी बुडला । नाहीं सोहळा साम्राज्या ॥ ३३ ॥ अनन्यभक्ता सभाग्याप्रती । सद्गुरुदास्य हेंचि प्राप्ति । तयातें हरिहर वंदिती । रज इच्छिती चरणींचे ॥ ३४ ॥ असो चौदा रत्नें सागरीं । मंथूनि काढिलीं सुरासुरीं । आणि पंधरा चिद्रत्नें खरीं । काढिलीं बाहेरी गुरुनाथें ॥ ३५ ॥ शांत सद्गुरु उदार । मंथूनिया संसारसागर । अनित्य सांडूनियां असार । निजनित्य सार निवडिलें ॥ ३६ ॥ नित्य नित्यत्वीं अनुसंधान । हेंचि निजसूत्र प्रमाण । माळे वोविलीं चिद्रत्नें । आवडी भूषण सच्छिष्या ॥ ३७ ॥ येणें भूषणें निजभक्त । ब्रह्मा हरिहर भाग्यवंत । शुकसनकादिक विरक्त । भक्त अनंत निजभाग्यें ॥ ३८ ॥ तरी हे माळा सच्छिष्याप्रती । देतसे आचार्य कृपामूर्ति । प्रीती अवधानें पुढें होती । ते भूषिती निजयोगें ॥ ३९ ॥ येथें पंधरा अंगें बोलिजेती । हृदयीं धरावीं परम प्रीती । घडे अखंड निजस्थिति । स्वानंदसंवित्ति स्वतःसिद्ध ॥ ४० ॥ असो पूर्वी बोलिलें निजज्ञान । स्वात्मप्रतीति निजनिर्वाण । तेंचि अखंडता दृढीकरण । होवया जाण निजनिष्ठा ॥ ४१ ॥ तरी जे बोलिजेती लक्षणें । होचि निष्ठा सर्वदां धरणें । निजध्यास सावधपणें । अनुसंधान स्वस्वरूपीं ॥ ४२ ॥

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्म[1]फलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥ १४ ॥**

तरी निजसुख होवयाकारणें । ज्ञान आणि अभ्यास धरणें । ज्ञानें निजतत्त्व जाणणें । अभ्यासें करणें मनन तैसें ॥ ४३ ॥ जाणोनि अध्यात्म तत्त्वज्ञान । तोचि निजध्यास अनुसंधान । या नांव बोलिजे निजध्यासन । नुरे भिन्न ध्येय धाता ॥ ४४ ॥

---

१ च ( क ). २ योगिया आंगीं ( अ ).

येणें ध्यानें सकळ । नुरे कर्म कर्ता कर्मफळ । मन ब्रह्माकार अमळ । तें कर्म केवळ ब्रह्म होय ॥ ४५ ॥ कर्म कर्ता नुरेचि भ्रांति । तेव्हां संचली सिद्धविश्रांति । निर्विकार पूर्ण शांति । निष्ठावंति भोगिजे ॥ ४६ ॥ ह्मणोनि आचार्य आपण । दावी अभ्यासलक्षण । सांडूनि सर्व अभिमान । सावधान अवधारा ॥ ४७ ॥

**नित्याभ्यासादृते प्राप्तिर्न भवेत्सच्चिदात्मनः ।**
**तस्माद्ब्रह्मनिदिध्यासो जिज्ञासोः श्रेयसे चिरम् ॥१५॥**

जाणितलिया शब्दज्ञान । नित्याभ्यास न करितां जाण । प्राप्त नोहे[1] समाधान । सच्चिदानंद[2] परमात्मा ॥४८॥ याकारणें ब्रह्मस्थिति । निजध्यासें गुरुप्रतीति । सावध ज्ञानी अखंड करिती । सुखसंवित्ति[3] चिरकाल ॥४९॥ पूर्वाचार्य[4] हेचि स्थिति । अंगें स्वानंद भोगिति । येथें पंधरा अंगें असती । ऐका निश्चिती आचार्य ह्मणे ॥५०॥

**यमो हि नियमस्त्यागो मौनं देशश्च कालता ।**
**आसनं मूलबंधश्च देहसाम्यं च दृक्स्थितिः ॥ १६ ॥**
**प्राणसंयमनं चैव प्रत्याहारश्च धारणा ।**
**आत्मध्यानं समाधिश्च प्रोक्तान्यंगानि वै क्रमात् ॥ १७ ॥**

यम नियम आणि त्याग । मौन देश काळ सांग । आसन मूळबंध समअंग । पाहणें चांग दृष्टीचें ॥ ५१ ॥ प्राणायाम प्रत्याहार । बरवा धारणेचा प्रकार । आत्मध्यान निर्धार । समाधि साचार पधरावी ॥ ५२ ॥ हीं पंधरा अंगें निजध्यासीं । बोललीं ऐका विशद यांसि । पाविजे स्वानंदसुखासि । कैवल्यविचारासि सार्थक ॥ ५३ ॥ सार्थकता ज्ञानविचारा । धरितां निजात्म निर्धारा । आचार्य ह्मणे अवधारा । बरवा करा निजध्यास ॥ ५४ ॥

**सर्वं ब्रह्मेति वै ज्ञानादिंद्रियग्रामसंयमः ।**
**यमोऽयमिति संप्रोक्तोऽभ्यसनीयो मुहुर्मुहुः ॥ १८ ॥**

मिथ्या सर्व दृश्यभान । सर्व ब्रह्म मी आपण । जाणोनि अनुभवें निजज्ञान । अनुसंधान निजनिष्ठा ॥ ५५ ॥ निष्ठा ज्ञान निजसत्ते । धारणे धरावें इंद्रियांतें । इंद्रियांसहीत कर्मातें । ब्रह्मार्पण वरिच्यावरी ॥ ५६ ॥ मन स्वरूपीं सावधान । तुटों नेदितां अनुसंधान । इंद्रियक्रिया ब्रह्मार्पण । सहज जाण होतसें ॥ ५७ ॥ ब्रह्मरूप अवघें कर्म । तरी काय धर्माधर्म । ये आशंकेचा भ्रम । निरशी वसिष्ठ आपण ॥ ५८ ॥

**ग्राह्यग्राहकसंबन्धे समाने सर्वदेहिनाम् ।**
**योगिनः सावधानत्वं यत्तदर्चनमात्मनः ॥ १९ ॥**

---

१ नव्हे ( अ ). २ सच्चिदानंदघन ( क ). ३ सुख सर्वार्थ ( अ ). ४ पूर्वाचार ( अ ). ५ विज्ञानादिं ( अ ).

ग्राह्य विधिकर्माचरण । अग्राह्य अविधिआचरण । हें सर्व देहीं सारिखें जाण । कर्म आपण वेदाज्ञे ॥ ५९ ॥ येथें योगिये सावधान । स्वस्वरूपीं अनुसंधान । कर्म होये ब्रह्मार्पण । आत्मार्चन अनुभवें ॥ ६० ॥ हे कर्म आणि मी कर्ता । हे अज्ञानातें देहअहंता । ह्मणोनि जाली बद्धता । जन्ममृत्युता अनिवार ॥ ६१ ॥ येथें भक्त ज्ञानवंत । ब्रह्मानुभवें वर्तत । कर्मी नाहीं कर्मत्व । देहीं देहत्व असेना ॥ ६२ ॥ मन असतां ब्रह्मस्थिति । इंद्रियें निजज्ञानें नांदती । कर्म ब्रह्ममय प्रतीति । ब्राह्मण ह्मणती ब्रह्मकर्म ॥ ६३ ॥ मनीं मननें ब्रह्मानुसंधान । इंद्रियीं नांदे तेंचि ज्ञान । यम बोलिजे हाचि प्रमाण । अभ्यासु आपण सदा कीजे ॥ ६४ ॥

**सजातीयप्रवाहश्च विजातीयतिरस्कृतिः ।**
**नियमो हि परानंदो नियमः क्रियते बुधैः ॥ २० ॥**

आतां नियमाचें लक्षण । आपण आत्मा ब्रह्म पूर्ण । जन हे भावना लोपून । स्वयें जनार्दन प्रतीति ॥ ६५ ॥ हेंचि सदां अनुसंधान । सजातीप्रवाहो यासि नांव जाण । या सजातीप्रवाहीं असोन । विजातीभान निरशिजे ॥ ६६ ॥ मी देह आणि हे जन । ऐसें भासे वृत्तिचिन्ह । त्यातें मिथ्यत्वें निरसून । सावधान स्वस्वरूपीं ॥ ६७ ॥ जें जें भासे विपरीत ज्ञान । तया निजज्ञानें निरसून । सदां स्वरूपीं सावधान । नेम जाण ऐसाचि ॥ ६८ ॥ यया नेमें क्षुद्रानंदु । तुटोनि होइजे परमानंदु । हा नेम करिती साधू । ज्ञानी प्रबुद्ध सर्वदां ॥ ६९ ॥ श्रीशंकराचार्य आपण । दावूनि यमनियमांची खूण । सांगे त्यागाचें लक्षण । सावधान परियेसा[1] ॥ ७० ॥

**त्यागः प्रपंचरूपस्य चिदात्मत्वावलोकनात् ।**
**त्यागो हि महतां पूज्यः सद्यो मोक्षाय यो मतः ॥ २१ ॥**

या प्रपंचाचें रूप जाण । अज्ञानें भासे विपरीत ज्ञान । तुटतां स्वरूपानुसंधान । प्रपंचभान विचित्र दिसे ॥ ७१ ॥ यालागीं असावें सावधान । तुटों न द्यावें अनुसंधान । अवघा आत्मा ज्ञानघन । प्रपंचभान अति मिथ्या ॥ ७२ ॥ प्रपंचाचें रूप जाण । त्यागावें मिथ्या विपरीत ज्ञान । पूर्ण मी आत्मा ज्ञानघन । अवलोकन अनुभवें ॥ ७३ ॥ हा त्याग महंतांतें[2] । परम पूज्य निजात्मते । सिद्धचि मोक्षमय यातें । ह्मणती ज्ञाते वसिष्ठादिक ॥ ७४ ॥ आतां मौनाचें लक्षण । सांगे आचार्य आपण । जेणें पाविजे समाधान । स्वानंदघन सदोदित ॥ ७५ ॥

**यस्माद्वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ।**
**यन्मौनं योगिभिर्गम्यं तद्भवेत्सर्वदा बुधः ॥ २२ ॥**

निर्विकल्प जें हेतुस्फुरण । ज्यातें ह्मणिजे अंतःकरण । तें परा वाचा आपण । वर्ते जाण अज्ञानगर्भी ॥ ७६ ॥ तया हेतूचे पोटीं । वक्तव्याचें ज्ञान उठी । ते

[1] परिसावें (क). [2] महामहंतांतें (क).

पश्यंती हे गोष्टी । नाद उठी मध्यमा मग ॥ ७७ ॥ नादा पोटीं जाण । अक्षरें ठसावती आपण । शब्दीं दुमदुमिले जन । वैखरीगर्जेन शब्दाक्षरी ॥ ७८ ॥ एवं अज्ञानगर्भी जाण । वर्ते वाचेचें विंदान । वेद शास्त्रें पुराणँ । जन वन अवघेंही ॥ ७९ ॥ या अज्ञानाचें निरसन । करिजे वृत्तिरूप ज्ञान । तेंही शाब्दिक जाण । श्रुति आपण बोलतु ॥ ८० ॥ जाहलिया अज्ञाननिवृत्ति । ज्ञान सांडी ज्ञातृत्वशक्ति । ठाव नुरे वाचेप्रती । युक्ति खुंटती जाणिवेच्या ॥ ८१ ॥ जेथें हेतूसि नाहीं ठावो । मनसंकल्प जाला वावो । संकल्पें न घडे अनुभव । भावाभाव असेना ॥ ८२ ॥ हें मौन गम्य योगियातें । सर्वदां प्रबुद्ध भजतां यातें । गम्यागम्यता नाहीं जयातें । निजमौनातें सदां भजती ॥ ८३ ॥

**वाचो यस्मान्निवर्तंते तद्वक्तुं केन शक्यते ।**
**प्रपंचो यदि वक्तव्यः सोऽपि शब्दविवर्जितः ॥ २३ ॥**

जेथें वाचा वावरूं[1] न शके । मा वक्ता वक्तृत्व केविं शके । प्रपंच बोलणें आसिकें । नव्हेचि सतिकें[2] वाचिक ॥ ८४ ॥ वक्तृत्व[3] तितुकें अज्ञानवृत्ति । ज्ञानवक्तृत्व[4] अज्ञाननिवृत्ति । लटिकियातें लटकें ह्मणती । त्याही युक्ति तैशाची ॥ ८५ ॥ ह्मणवूनि प्रापंचिक जितुकें बोलणें । या शब्दा विवर्जित असणें । जेथें नुरिजे ज्ञानाज्ञानें । शब्दासि जिणें तेथें कैंचें ॥ ८६ ॥

**इति वा तद्भवेन्मौनं सतां सहजसंस्थितम् ।**
**गिरा मौनं तु बालानां प्रयुक्तं ब्रह्मवादिभिः ॥ २४ ॥**

ऐशी जे सहजस्थिति । या नांव मौन हें निश्चितीं । संतांची हे प्रतीति । पूर्ण ह्मणती निजमौन ॥ ८७ ॥ नेणोनि हें मौन साचें । अज्ञानीं मौन धारिलें वाचे । हें बोलणें ब्रह्मविदाचें । नेमिलें साचें अज्ञान ॥ ८८ ॥ यम नियम त्याग मौन । यांची दाविली बरवी खूण । देश तो एकांत विजन । सांगे रूपेनें आचार्य ॥ ८९ ॥

**आदावन्ते च मध्ये च जनो यस्मिन्न विद्यते ।**
**येनेदं सततं व्याप्तं स देशो विजनः स्मृतः ॥ २५ ॥**

या प्रपंचा आदि परब्रह्म । निर्विकार पूर्ण सम । आणि अंतीं तेंचि परम । असे चिद्व्योम संचलें ॥ ९० ॥ आणि मध्येंही पाहतां जाण । तेंचि स्वयें नांदे आपण । जैसें तरंगांलागून । जीवन पूर्ण आदिअंतीं ॥ ९१ ॥ भिंतीपूर्वी मृत्तिकाचि असे । भिंतीअंतीं मृत्तिकाचि वसे । मध्यें पाहतां भिंताचि दिसे । दुजें नसे मृत्तिकेविण॥ ९२॥ भिंती ह्मणणें मिथ्या वचन । मृत्तिका नांदे आपआपण । जग पाहतां मिथ्याभान । स्वयें जनार्दन एकला ॥ ९३ ॥ तेविं आदि अंतीं मध्यें पाहतां । जनभावना आति

---

१ शब्दात्मक ( अ ). २ वाच्य करूं ( अ ). ३ कर्तृत्व ( अ ). ४ ज्ञानकर्तृत्व ( अ ).

मिथ्या । पूर्ण व्याप्त वस्तुता । व्याप्य व्यापकता असेना ॥९४॥ देश ऐसें जें वचन । तया नांव एकांत विजन । आतां काळाचें वोळखण । आचार्य आपण दावित ॥९५॥

**कलनात्सर्वभूतानां ब्रह्मादीनां निमेषतः ।**
**कालशब्देन निर्दिष्टो ह्यखण्डानन्द अद्वयः ॥ २६ ॥**

काळ ह्मणजे सर्व भूतांतें । आणि ब्रह्मादि देवां सकळांतें । पिंड ब्रह्मांड सर्वांतें । निमिषें लयातें पाववी ॥ ९६ ॥ कल्पने पोटीं जगविस्तार । ते वृत्ति परतोनि ब्रह्माकार । होतां एक निमिषमात्र । त्यांत संहार जगत्त्रया ॥ ९७ ॥ मा अखंड ऐसा अद्वयानंदु । पूर्ण संचला स्वात्मबोधु । तेथें कैंचा दृश्यभेदु । काळ प्रसिद्धु या नांव ॥ ९८ ॥ जेथें मनपणें नाहीं मन । तथें कोण भावी जनत्वें जन । एवं काळ हा सांगोन । सांगे आसन आचार्य ॥ ९९ ॥

**सुखेनैव भवेद्यस्मिन्नजस्रं ब्रह्मचिन्तनम् ।**
**आसनं तद्विजानीयान्नेतरत्सुखनाशकम् ॥ २७ ॥**

येथें नाहीं कष्ट साधन । सुखस्थिति आनुसंधान । ब्रह्मत्वभावें सावधान । ब्रह्मचिंतन तदात्मक ॥ १०० ॥ चिंतिता चित्तचिंतन । त्रिपुटी न भासे मीपण । सिद्धब्रह्मात्मता संपूर्ण । सावधान सहजस्थिति ॥ १ ॥ या नांव बोलिजे सहजासन । पूर्ण सुखस्थिति समाधान । इतर सुखा नाशके आपण । चौरियासि जाण कष्टरूपें ॥ २ ॥

**[1]सिद्धं यत्सर्वभूतादि विश्वाधिष्ठानमव्ययम् ।**
**यस्मिन्सिद्धाः समाविष्टास्तद्वै सिद्धासनं भवेत् ॥ २८ ॥**

सिद्धचि सर्व भूतांतें । या पंचभूतिका विश्वातें । अव्यय [2]अधिष्ठान निरुतें । पूर्णपूर्णत्वें अविनाश ॥ ३ ॥ शिंपीपोटीं रजतभान । त्यातें शिंपीचें अधिष्ठान । विश्वाधिष्ठान आपण । अव्यय पूर्ण परब्रह्म ॥४॥ ऐसी ब्रह्मस्थिति समसमान । हें सिद्धाचें सिद्धासन । सज्ञानातें अखंड भजन । सावधान सहजासनी ॥५॥ यम नियम आणि त्याग । मौन देशकालसांग । दाऊन आसनाचें अंग । मूळबंधप्रयोग आचार्य वदे ॥६॥

**यन्मूलं सर्वलोकानां तन्मूले चित्तबंधनम् ।**
**मूलबन्धः सदा सेव्यो योगेशो राजयोगिनाम् ॥ २९ ॥**

जें मूळ सर्व भूतांतें । जैसें जीवन तरंगांतें । वृत्तीचे पोटीं सर्व भूतें । मूलवृत्तीतें निर्मूळ जें ॥७॥ येथें चित्तवृत्ति लागून । परतोन लागता अनुसंधान । चित्ताचि होय [3]चैतन्यें । चित्तबंधन या नांव ॥८॥ ज्यातें बोलिजे मूळबंध । तो हाचि एकु प्रसिद्ध । [4]निजध्यास हा निजात्मबोध । [5]स्वतः सिद्ध स्वरूपस्थिति ॥ ९ ॥ या मूळबंधाचें

---

१ सिद्धयेत्. २ अनुष्ठान ( क ). ३ चैतन्यघन ( क ). ४ निजध्यासें ( अ ). ५ साधका ( अ ).

सेवन । कीजे निजध्यासें आपण । हा राजयोग निजज्ञान । परमप्रमाण योगियां ॥ १० ॥ आतां अंगाची समता । सांगेल आचार्य तत्वतां । सिद्ध शाश्वत पूर्णता । सम अखंडता संचली ॥ ११ ॥

**अगानां समतां विद्यात्समे ब्रह्मणि लीनता ।**
**नो चेन्नैव समानत्वमृजुत्वं शुष्कवृक्षवत् ॥ ३०॥**

आसनीं मूळबंध पुरता । यावरी अंगाची जे समता । ऐसी जाणावी वस्तुता । बुद्धि विषमता मांडावी ॥ १२ ॥ बुद्धीच्या ठायीं देहाभिमान । इंद्रियद्वारा विषयज्ञान । विपरीतज्ञानें भेदभान । विषम जाण जें भासे ॥ १३ ॥ या नांव अंगाची विषमता । येथे ऐसी धरावी समता । विवेकें निरसुनी देहात्मता । निज निश्चयता आत्मत्वीं ॥ १४ ॥ बुद्धीनें धरितां निजात्मज्ञान । मावळे देहींचा देहाभिमान । आत्मसमतें विपरीत ज्ञान । भेदभान हारपे ॥ १५ ॥ तेंव्हां सहजची समसमान । संचलें ब्रह्मात्मज्ञान । बुद्धि निश्चयीं जहाली लीन । जहालेपण विसरूनी ॥ १६ । यां[१] सम अगसमता । हें नेणोनि जे देहात्मता । देहीं दिसे तटस्थता। शुष्क पाहतां वृक्ष जैसा ॥ १७ ॥ आसनी मूळबंधधारण । सहज समअग समान । यावरी दृष्टीचें अवलोकन । दावी कृपेनें शंकर ॥ १८ ॥

**दृष्टिं ज्ञानमयीं कृत्वा पश्येद्ब्रह्ममयं जगत् ।**
**सा दृष्टिः परमोदारा न नासाग्रविलोकिनी ॥ ३१ ॥**

स्वरूपीं नसतां अनुसंधान । अज्ञानदृष्टि विपरीत ज्ञान । भेद भांसे छिन्नभिन्न । दृष्टि अज्ञानते ऐसी ॥ १९ ॥ आणि बुद्धीस ब्रह्मानुसंधान । इंद्रियीं नांदे निजात्मज्ञान । जनाचि भांसे जनार्दन । ब्रह्मपूर्ण ज्ञानदृष्टि ॥ २० ॥ ऐसी दृष्टि ज्ञानमय । जगत्व लोपुनी ब्रह्ममय । दृष्टि हे उदार तन्मय । स्वानंद स्वयें सदोदित ॥ २१ ॥ नसतां हें निजात्मधारण । नुसतें नासिकाग्रविलोकन । नव्हे तें आत्मत्वीं प्रमाण । अज्ञानसाधन पूर्वपक्षीं ॥ २२ ॥

**द्रष्टृदर्शनदृश्यानां विरामो यत्र भावयेत् ।**
**दृष्टिस्तत्रैव कर्तव्या न नासाग्रविलोकिनी ॥ ३२ ॥**

द्रष्टा ह्मणजे पुरुष आपण । दृश्य ते वृत्तिभेद जन । दृश्य परीक्षा दिसे ज्ञान । त्यातें दर्शन बोलिजे ॥ २३ ॥ आणि ज्ञानदृष्टीं पाहतां जाण । आवघा आत्मा ब्रह्मपूर्ण । तेथें कैचें दृश्यभान । द्रष्टा आपण कवणाचा ॥ २४ ॥ दृश्य पाहतां मिथ्या भान । अवघा आत्मा ब्रह्मपूर्ण । दृश्य नसतां द्रष्टा कवण । कोणा दर्शन कोणाचें ॥ २५ ॥ ऐसा त्रिपुटीचा अभाव । भावनेरहित हा निजभाव । ज्ञानदृष्टी निजानुभव । करुनि वयमेव सावध ॥ २६ ॥ अनुभवज्ञानें सावधान । स्वस्वरूपीं अनुसंधान । अखंड

१ ब्रह्मत्वज्ञान ( अ ). २ या नांव समअंगसमान ( अ ).

असणें हें प्रमाण । निष्ठा सज्ञान ज्ञानियां ॥ २७ ॥ नेणोनि हे निजात्मखुण । नुसते नासाग्रीं अवलोकन। हे तव अज्ञानालागुन। सज्ञाना प्रमाण स्वरूपस्थिति ॥२८॥ आतां प्राणायामाचें लक्षण । बोलिजेल त्याचें सिद्धांत ज्ञान । मुमुक्षी होईजे सावधान । आचार्य आपण तुष्टला ॥ २९ ॥

**चित्तादिसर्वभावेषु ब्रह्मत्वेनैव भावनात् ।**
**निरोधः सर्व वृत्तीनां प्राणायामः स उच्यते ॥ ३३ ॥**

गुरुकृपेनें ब्रह्मा[1]रण । निरसूनि स्वरूपीं सावधान । होतां निरसे विपरीत ज्ञान । पालटे चिन्ह वृत्तीचें ॥ ३० ॥ चित्तचतुष्टय अंतःकरण । ब्रह्मभावनें झालीं लीन । कैसें धरलें अनुसंधान । सावधान अवधारा ॥ ३१ ॥ देहीं जो मीपणें अहंकार । तेणें सांडिला देहाकार । पूर्णब्रह्म परात्पर । निर्विकार सोहंपणें ॥ ३[2] ॥ पदार्थ मिथ्या हे जाणोन । चित्तचैतन्य अनुसंधान । धरितां भासे चैतन्य घन । पदार्थभान नाठवे ॥ ३३ ॥ देह निश्चय पदार्थज्ञान । बुद्धिनें सांडूनि आपण । धारणा निश्चय धरिली पूर्ण । समसमान पूर्णत्वें ॥ ३४ ॥ जेथें बुद्धीचा निजनिश्चय । तेथेंचि मनही तन्मय । कल्पना गिळुनी तन्मय । उन्मन होय सहजपणें ॥ ३५ ॥ निरसूनि गेलिया अज्ञान । शून्यत्व सांडी अंतःकरण । आत्मप्रतीति ज्ञानघन । सहज आपण कोंदली ॥ ३६ ॥ इंद्रियद्वारीं हेचि स्थिति । कोंदली निजात्मप्रतीति । क्रिया ब्रह्मार्पण आयिति । अहंकृति असेना ॥ ३७ ॥ भोजनें तृप्त जे अंतरीं । तेचि वृत्ति इंद्रियद्वारीं । क्षुधेल्याची क्षुधा वरी । दिसे बाहेर प्रगटेचि ॥ ३८ ॥ हे पूर्णस्थिति निजनिर्वाण । हेचि साध्य साधन । हेंचि करावें अनुसंधान । सावधान स्वस्वरूपीं ॥ ३९ ॥ भोजन करितां जैसें पाहे । विशेष तृप्ती ग्रासीं आहे । तेवि विशेष सावधान राहे।तोचि लाहे विशेष ॥ ४० ॥ चित्तादि सर्व स्वभाव । येथें ऐसा ब्रह्मानुभव।निरोधून वृत्ति सर्व।असावें स्वयमेव सावध ॥४१॥ एकाचि वृत्तीचे प्रभाव। चित्तचतुष्टय विकार।तेचि वृत्ति ब्रह्माकार।करावी स्थिर निजध्यासें॥४२॥ निजवृत्तीचें स्फुरण । या नांव बोलिजे मुख्य प्राण । याचें करावें आकर्षण । अनुसंधान निजनिष्ठा ॥ ४३ ॥ या नांव बोलिजे प्राणायाम । बोलिला शंकर पुरुषोत्तम । परम प्राप्तीचें हें वर्म । निज निभ्रम निजस्थिति ॥ ४४ ॥ आतां प्राणायामाचे भेद । रेचक पूरक कुंभक विविध । येकत्वें जाणणें अनुभवसिद्ध । परिसा सावध अनुक्रमें ॥ ४५ ॥

**निषेधनं प्रपंचस्य रेचकाख्यः समीरणः ।**
**ब्रह्मैवास्मीति या वृत्तिः पूरको वायुरीरितः ॥ ३४ ॥**

पाहतां नित्यानित्यविवेकें । अज्ञानजनित अनित्य लटिकें । नित्य शाश्वत जाणोनि

---

१ भ्रमावरण ( क ). २ समत्वें ( अ ).

निके । ज्ञान सम्यक निश्चयें ॥ ४६ ॥ मनोकल्पित जनभेद । येरव्हीं नाहीं अनुभवसिद्ध । सत्य सर्वात्मा प्रसिद्ध । अद्वयानंद संचला ॥ ४७ ॥ ऐसें प्रपंचाचें निषेधन । या नांव रेचक पवन । ब्रह्मभावना अनुसंधान । पूरक आपण हा वायु ॥ ४८ ॥

**ततः सद्वृत्तिनैश्चल्यं कुंभकः प्राणसंयमः ।**
**अयं चापि प्रबुद्धानामज्ञानां घ्राणपीडनम् ॥ ३५ ॥**

वृत्तीनें सांडूनि असंतमळ । सद्‍स्वरूपीं सद्‍त्वें निश्चळ । या नांव कुंभक निर्मळ । प्राणायाम केवळ या नाम ॥ ४९ ॥ हा प्राणायाम बुद्धानें । मानला आहे निजात्ममतें । नाक धरूनि बळकट हातें । अज्ञानातें हा नेम ॥ ५० ॥ सांगोनियां प्राणायामविचार । त्यावरी सांगे प्रत्याहार । बरवा धरावा निर्धार । आचार्य शंकर सावध ह्मणे ॥ ५१ ॥

**विषयेष्वात्मतां दृष्ट्वा मनसश्चिति मज्जनम् ।**
**प्रत्याहारः सविज्ञेयोऽभ्यसनीयो मुमुक्षुभिः ॥ ३६ ॥**

मी देह भोक्ता आपण । सुखी केलिया विषयाचरण । या नांव बोलिजे विपरीतज्ञान । प्रवृत्ति आज्ञानजननी ये ॥ ५२ ॥ येथें सज्ञाना ऐसी प्रतीती । जाणोनि आत्मा स्वानंद स्थिति । विषयीं देखे आत्मप्रतीती । विकारवंती वृत्ती नव्हे ॥ ५३ ॥ होतां विषयाचें दर्शन । तव देखे आपेआपण । समुद्र देखे तरंगपण । तेविं सज्ञाना विषयो दिसे ॥ ५४ ॥ सुखस्वरूप स्वानंदघन । अवघे देखे आपणें आपण । ह्मणोनि विराली वासना । अविकारपणा मन आलें ॥ ५५ ॥ मनें सांडिलें विपरीत ज्ञान । चित्तचैतन्यीं अनुसंधान । जन अवघे जनार्दन । स्वानंदपूर्ण पूर्णत्वें ॥ ५६ ॥ हा प्रत्याहार पूर्णपणीं । अभ्यासिजे मुमुक्षुजनीं । निश्चळ स्वात्मानुसंधानीं । धारणे लागुनी अवधारा ॥ ५७ ॥

**यत्र यत्र मनो याति ब्रह्मणस्तत्र दर्शनात् ।**
**मनसो धारणं चैव धारणा सा परा मता ॥ ३७ ॥**

सांडूनि स्वरूप अनुसंधान । जये संकल्पे धांवे मन । तव आत्मा ब्रह्मपूर्ण । प्रतीति जाण अनुभवें ॥ ५८ ॥ तरंग जेथें उठोनि जाय । तेथें जीवनाचि भरलें आहे । तेथिंचा तेथें विरोनि ठायें । अनुभवें पाहे मन तैसें ॥ ५९ ॥ ऐसी अखंड धारणा । अनुभवें लावी दृढ मना । विरे कल्पित कल्पना । अनुसंधाना धरिलिया ॥ ६० ॥ मनासि ऐसी स्वरूपस्थिति । धारणा लावावी निजधृतिं । हे धारणा महामहंती । निजात्म मति प्रमाण ॥ ६१ ॥ आतां शंकर आपण । सांगे ध्यानाचें लक्षण । सस्वरूपीं अनुसंधान । सावधान निजनिष्ठा ॥ ६२ ॥

---

१ प्रतिपाद्ये ( क ).

**ब्रह्मैवास्मीति सद्वृत्त्या निरालम्बतया स्थितिः ।**
**ध्यानशब्देन विख्याता परमानन्ददायिनी ॥ ३८ ॥**

पूर्ण अद्वैत भेदशून्य । मी परब्रह्म परिपूर्ण । दुजें नाहीं अनुप्रमाण । सोहं संपूर्ण ब्रह्म मी ॥ ६३ ॥ ऐसी सद्‌त्वें सावधवृत्ति । निरालंब पूर्णस्थिति । सहज सावधान प्रतीति । आन स्फूर्ति असेना ॥ ६४ ॥ पूर्णत्व सिद्ध चिद्गगन । दुजें नाहीं अवलंबन । ऐशिये स्थिति बोलिजे ध्यान । सावधान सहजस्थिति ॥ ६५ ॥ ध्येय ध्याता ध्यानेवीण । या नांव बोलिजे निजध्यान । हें विख्यात परम प्रमाण । स्वानंदघनदायक ॥ ६६ ॥ येथें निजध्यान करी । पूर्ण समाधान अंतरीं । अविकार स्थिति बरी । समाधी पुरी तीं नांव ॥ ६७ ॥ तें समाधीचें लक्षण । सांगे आचार्य कृपाघन । हें प्रधरावें चिद्रत्न । श्रवणीं मंडन सभाग्या ॥ ६८ ॥

**निर्विकारतया वृत्त्या ब्रह्माकारतया पुनः ।**
**वृत्तिविस्मरणं सम्यक्समाधिर्ज्ञानसंज्ञकः ॥ ३९ ॥**

वृत्तीचे पोटीं दृश्याकार । विचित्र भासे जगदाकार । अपार आकार विकार । अज्ञानें साचार ऐसे दिसे ॥ ६९ ॥ देहाभिमानें वृत्तिस्फुरण । अपार दुःखें जन्म मरण । गणित न करवे जाण । अंधार कवण गुणूं शके ॥ ७० ॥ तैसे हे वृत्तीचा पसारा । अपार न गणवे श्रुतिशास्त्रा । मृगजळाचिया पुरा । कोणें भराउभरि कीजे ॥ ७१ ॥ एवं हा मिथ्या वृत्तिविकार । परी अज्ञानें दिसे साचार । सद्गुरुभजनीं जो निर्धार । निर्विकार प्राप्ति तथा ॥ ७२ ॥ सद्गुरुचरणीं अनन्यप्रीति । तुष्टला सद्गुरु कृपामूर्ति । निरसूनियां अज्ञानभ्रांति । निर्विकारस्थिति सुखदाता ॥ ७३ ॥ येथें ज्ञानगर्वी धरी बळ । तोही अज्ञानाचि केवळ । त्याचें न तुटे भ्रांतिपडळ । स्वानंद प्रबळ प्राप्ति नोहे ॥ ७४ ॥ सद्गुरुरूपें ज्ञान निर्धार । निरसे अज्ञान वृत्तिविकार । सावध झालिया साचार । स्वप्नव्यवहार हारपे ॥ ७५ ॥ हारपे देहबुद्धि अभिमान । हारपे दृश्य जनत्व जन । निर्विकार ब्रह्म पूर्ण । समसमान समत्वें ॥ ७६ ॥ सांगीतला निजनिर्धार । अभ्यासें वृत्ति तदाकार । जालिया निरसे विकार । निर्विकार निजवृत्ति ॥ ७७ ॥ निर्विकार निजवृत्ति । निष्ठाधारण हेचि धृति । पुन्हा पुन्हा अभ्यासस्थिती । होय वृत्ति तदात्मक ॥ ७८ ॥ तदात्मक समाधान । मग विसरे जालेपण । सिद्ध स्वानंद सहजपूर्ण । कोंदला निर्वाण सहज स्थिति ॥ ७९ ॥ जीवना होणें नलगे जीवन । कीं गगना होणें नलगे गगन । जागतयातें जागेपण । यावें जाण लागेना ॥ ८० ॥ तैसा सिद्ध स्वानंदपूर्ण । तया न घडे जालेपण । यालागी वृत्तिविस्मरण । समाधी जाण ते ऐसी ॥ ८१ ॥ मी पावलों आनंदघन । ऐसें म्हणता दुजा कवण । सूर्योदय सूर्यालागुन । होणें जाणें लागेना ॥ ८२ ॥ तैसी सिद्धस्वरू-

परिस्थिति । होणें न होणें विराली वृत्ति । ज्ञानी समाधी तयातें म्हणती । पूर्ण आइती स्वानंदा ॥ ८३ ॥ वृत्ति न उठे वृत्तिपणें । आकर्षण धारणा नलगे धरणें । सहज स्थिति अखंडपणें । सज्ञानी म्हणे समाधी हे ॥ ८४ ॥ असो हे समाधी हरिगुरुभक्तां । आइती असे भाग्यवंता । अद्वैत भजन ये हातां । स्वानंदता निजध्यासें ॥ ८५ ॥ निजध्यास नाहीं अंतरीं । शब्दज्ञानें बडबड करी । वादा फिरे जगाभीतरी । दुःखसागरीं निमग्न ॥ ८६ ॥ निश्चयात्मक जालिया ज्ञान । संचलें नांदे समाधान । सज्जन होइजे निरभिमान । स्वानंदघन नांदती ॥ ८७ ॥ निरपेक्ष निर्वैर निरभिमान । शांतिसुखरूप सज्जन । कामादि वृत्ति विरोन । समाधान सबाह्य ॥ ८८ ॥ त्याचि करितां निजस्तुती । वेदशास्त्रें न पुरती । स्वमुखें वर्णिती श्रीपती । उदार कीर्ति जयाची ॥ ८९ ॥ पंधरा चिद्रत्नांची माळा । अभेदें मिरवे ज्याचिया गळां । राजयोगी तो आगळा । सौभाग्यलीला नांदतु ॥ ९० ॥ तोचि सद्गुरु सदाशिव । तोचि श्रीकृष्ण स्वयमेव । सद्गुरु माझा महादेव । कृपाळु सर्व भक्तजनां ॥ ९१ ॥ सद्गुरुचरणीं प्रेमभाव । प्रेमें तुष्टे सद्गुरुराव । चिद्रत्नमाळा गौरव । देतो स्वयमेव गुरुभक्तां ॥ ९२ ॥ माळा घालूनियां कंठीं । सबाह्य पाहे कृपादृष्टी । श्रीकृष्ण माउली गोमटी । स्वानंदपुष्टीं संतुष्ट करी ॥ ९३ ॥ ऐसिया श्रीकृष्णाचा अंकित । अभेदें अनन्य शरणागत । श्रीकृष्णस्वामी हा समर्थ । कृपावंत भजलागीं ॥ ९४ ॥ कृष्णकृपाकटाक्षबळें । सिद्धचि स्वानंद सोहळे । संतसंगें खेळे मेळे । सहजलीले साम्राज्य ॥ ९५ ॥ साम्राज्यसुख वैभव । भक्त भोगिती निगर्व । त्याचे चरणीं अनन्यभाव । तेणें गुरुराव संतुष्टे ॥ ९६ ॥ नवविधा नवरात्र अनन्यपणीं । आत्मनिवेदन होम करोनि । विजयादशमी पूर्णपणीं । सद्गुरुचरणीं स्वानंद ॥ ९७ ॥ सद्गुरुसत्संगतिभोजन । पूर्णतृप्ती समाधान । परमानंदें हरिकीर्तन । स्वानंदगर्जन मांडिलें ॥ ९८ ॥ सुखासनीं स्वामी पंढरिनाथ । सद्गुरु श्रीकृष्ण समर्थ । मी अनन्य लाडिका दूत । पुढें नाचत स्वानंदें ॥ ९९ ॥ टाळ मृदंग दुमदुमित । भेरी निशाणें वाजत । संत स्वानंदें नाचत । रंगले डोलत महावीर ॥ २०० ॥ आनंद उसळत भक्तजनीं । गर्जती नामें गगना गिळुनी । प्रेमटाळिया वाजवुनि । तल्लिन कीर्तन सुखमय ॥ १ ॥ सीमा नाहीं हे सुखस्थिति । अनुभव नारदादिक जाणती । सीमालंघनें हे निजभक्ति । स्वानंदप्रतीति स्वराज्य ॥ २ ॥ एवं विजयादशमी स्वानंदसण । सिद्धभक्तिनें सीमालंघन । परमानंदें हरिकीर्तन । करिती गर्जन हरिभक्त ॥ ३ ॥ तव साम्राज्य स्वानंदसदनीं । शांती माउली रुक्मिणी । आली आरती घेउनी । कृपाळू जननी भक्तजना ॥ ४ ॥ पूजा करूनि गोमटी । ओवाळिला जगजेठी । मंगळानंदें ध्वनि उठी । हरीख पोटीं न सामाय ॥ ५ ॥ भावार्थपूजेचा संभार । संतु-

---

१ संचरलें नांदे (अ). २ हरिसदनीं (अ).

हला सर्वेश्वर । उचित सिद्धचि अपार । स्वानंदसार स्वयें देतु ॥ ६ ॥ तेथें मी अनन्य लडिवाळ । वोसंगा खेळे निजबाळ । माझीया मायबापा कृपाळ । करितसां सांभाळ सर्वदा ॥ ७ ॥ पूर्णतृप्ती समरंगणीं । सुखें खेळे संतचरणीं । समाधी सुखाची लेणीं । मजलागुनी खेळवी ॥ ८ ॥ बोबडया वचनीं गात नाचत । सुखें दोंदिल डोलत । सबाह्य श्रीकृष्ण सांभाळित । स्वानंदभरित सर्वदा ॥ ९ ॥ कृष्णदास जयराम । श्रीकृष्णें ठेवुनियां नाम । संतसंगें सुखसंभ्रम । क्रीडा मनोरम निजभक्ति ॥ १० ॥ भक्तिसुखाचे सोहळे । श्रीकृष्ण भोगवी कृपाबळें । सुखस्थिति अहंभाव गळे सुखाचि सगळें सुखरूपें ॥ ११ ॥ असो सुखपणें सद्गुरुनाथ । श्रीशंकराचार्य समर्थ । अपरोक्षज्ञानें कृपावंत । बोलिला अद्भुत निजध्यासु ॥ १२ ॥ या निजध्यासाचें दृढीकरण । पुढील लेखप्रकरणीं निरोपण । सांगेल आचार्य कृपाघन । सावधान अवधारा ॥ १३ ॥ हें समाधिस्थ निरोपण । बोलिलें सुखश्री विधान । भक्त सभाग्या लागुन । प्राप्ती पूर्ण गुरुकृपें ॥ १४ ॥ स्वात्मसुखाचे विलास । भक्त भोगिती सावकाश । जयराम कृष्णदास । कृष्णभेटीस कृष्ण-कृपा ॥ १५ ॥ इति श्रीअपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुखगौरव । निजध्यास समाधि स्वयमेव । सद्भाव प्रकरण आठवें ॥ २१६ ॥

श्री सद्गुरुनाथार्पणमस्तु ॥

ॐ नमो सद्गुरु योगिराजा । सिद्ध स्वानंद महाभोजा । उदार चक्रवर्ती सहजा । शांता निजा सदाशिवा ॥ १ ॥ शांति सद्गुरु श्रीकृष्णमूर्ति । वेद वर्णी उदार कीर्ती । वर्णितां खुंटली युक्ति । न कळे म्हणती ब्रह्मादिक ॥ २ ॥ स्वामी ते प्राकृत वचनीं । केवीं वर्णवे मजलागुनी । परी आवडी न राहे उगेपणीं । बोबडी वचनी नाचत ॥ ३ ॥ गंधर्व अप्सरा किन्नर । नृत्यगायनीं अतिचतुर । त्यांत खोडी अपार । काढिती साचार सर्वज्ञ ॥ ४ ॥ आणि नृत्य गोपाळाचें । वाकुडें बोबडें प्रेमळाचें । तूं मानिसी सुखाचें । नृत्य साचें स्वय करिसी ॥ ५ ॥ थोरीव सांडोनियां नाचसी । स्वयें आपणां उचित देसी । अनन्याची प्रीत ऐसी । सर्वज्ञासि तुज आहे ॥ ६ ॥ बाळक जैसें नाचे गाये । पिता संगीत पाहे काये । आवडी देखोनियां धाये । आलिंगी स्वयें सुख-रूपें ॥ ७ ॥ तैसा तूं बाप कृपाळू । शरणागत मी अनन्य बाळ । तुझिये कृपें सुख प्रबळ । आवडी मंगळ गातसे ॥ ८ ॥ अनंता तुझी कृपामूर्ति । वर्णवे ऐसी कवणा स्फूर्ति । आवड तुझी कृपामूर्ति । प्रेमळप्रीति मानसीं ॥ ९ ॥ चंद्रासि घालिजे विजन वारा । कीं वातीनें ओंवाळिजे दिनकरा । अंजळीं अभिषेकु सागरा । भावार्थ पुरा मान्य करिसी ॥ १० ॥ अमर्याद अनंत परिपूर्ण । आलक्ष थोरीव लक्षी कवण । तुळसीपानाहूनि सान । आवडी जाण तूं कशी ॥ ११ ॥ म्हणवूनि कृष्णा भाव प्रिय ।

तूं कृपाळू बापमाय । शरणांगत मी तुझा स्वयें । आवडी गाय तुझेंनि तुज ॥ १२ ॥ तुझा तरंग तुजभीतरी । तुज माझी क्रीडा तुझेनि करी । मीपणां तेथें कैची उरी । क्रीडसी हरी तुझा तूं ॥ १३ ॥ तुझी कृपा होय जेथें । मीपणा अंत नुरे तेथें । सिद्ध स्वानंद सदोदित । स्वयेंचि देत तूं भक्तां ॥ १४ ॥ अनंता अनंत सुखी केलें । अनंता अनंत दान दीधलें । अनंता तुवां केले । अनंत ठेले अनंत सुखें ॥१५॥ निरसूनियां अनंतदुःख । कृपें देसी अनंतसुख । दाता अनंत तूं येक । अनंत सुखदायक अनंता तूं ॥१६॥ साधका होतां पूर्णप्राप्ति । विघ्नें अनंतें ओढवती । तुझे चरणीं नाहीं प्रीति । तया भ्रांति नुलंघवे ॥ १७ ॥ तूं तव कैवारी भक्तजना । सबाह्य रक्षिसी कृपाघना । वाट यावया नाहीं विघ्नां । कृष्णा चिद्धना तुझी कृपा ॥ १८ ॥ मीपणें उघडें दिसावें अंग । तरीच विघ्नाचा चाले लाग । भक्ता तुझी कृपा सांग । नाठवे जग मीपणेसी ॥ १९ ॥ विघ्नांसी यावया होय ठाव । तेथें स्मरणीं तुझें नांव । तंव ते विघ्न होय वाव । तुझा अनुभव कोंदाटे ॥ २० ॥ कोंदाटे तुझा अनुभव । तेथें कैचा अहंभाव । मनाचा हारपे स्वभाव । स्वानंद स्वयमेव तुझा तूं ॥ २१ ॥ ह्मणे जयराम कृष्णदास । कृष्णा धरिली तुझी कांस । निर्भय नांदे सावकाश । जीवन आह्मास तुझे पाय ॥ २२ ॥ सोडुनी योगाचा अभिमान । सांडुनी योग्यता शहाणपण । महर्षि तुज आले शरण । तुझेनि निर्विघ्न सुखरूप ॥ २३ ॥ सुखें असती समाधिस्थित । स्वधर्में भक्तियोगें वर्तत । त्याची आज्ञा प्रतिपाळित । अवतार धरिसी तूं सुखें ॥ २४ ॥ असो त्याचें समाधीचें लक्षण । शंकराचार्य सांगोनि पूर्ण । आतां सांगेल दृढीकरण । सावधान अवधारा ॥ २५ ॥

**इमां चावृत्तिमानंदं तावत्साधुः समभ्यसेत्[1] ।**
**वश्यो यावत्क्षणात्पुंसा प्रयुक्तः संभवेत्स्वयम् ॥ १८ ॥**

सहज निर्विकार स्वरूपस्थिति । सिद्धचि संचिली आइती । अखंड स्वानंदसंवित्ति । वृत्ति निवृत्ति सहजपणें ॥ २६ ॥ ऐसा सिद्धचि स्वानंद । या नांव अकृत्रिम आनंद । हा अखंडित निजबोध । घडे स्वतःसिद्ध अविकार ॥ २७ ॥ आवरावी नलगे वृत्ति । ना नव्हे विकारवंती । नलगे धरणें धृति । सिद्ध संवित्ति ढळेना ॥ २८ ॥ अणुमात्र नाहीं विस्मरण । ना नलगे करणें स्मरण । स्वरूपस्थिति नाहीं खंडण । अनुसंधान धरणें नलगे ॥ २९ ॥ या नांव अकृत्रिम आनंद । बरवा जोडे स्वतःसिद्ध । तववरी भलें साधन । अभ्यास सावध करिताती ॥ ३० ॥ आणि अखंडानंदस्थिति । ज्या पुरुषा पूर्णप्राप्ति । तेथें वृत्ति आणि निवृत्ति । तयाप्रति बोलों नये ॥ ३१ ॥ ऐसी स्थिति सदृढता । बाणली नाहीं अखंडता । तंववरी निजध्यासता । करावी ज्ञाता दृढस्थितिं ॥ ३२ ॥ येथें जो आळस करी। शब्दज्ञानें महंती धरी । ज्ञाताचि परी

1 साधु ( क ).

अज्ञानपुरीं । वाढवेल भारी अभिमानें ॥ ३३ ॥ विवेक वैराग्य प्रबळ । आलस्य सांडूनि निर्मळ । स्वरूपाकार निजनिश्चळ । त्यासीच केवळ सुखसिद्धि ॥ ३४ ॥ मज जालिया अखंडता । हेही नाहीं सूक्ष्म अहंता । सिद्धची बाणली सत्स्वरूपता । आभासकता राहिली ॥ ३५ ॥ भोजनीं तृप्ती झाल्या पूर्ण । करणें राहिलें भोजन । मी तृप्त हें विस्मरण । परिपाकीं जाण नाठवे ॥ ३६ ॥ कीं स्वप्नींहूनि जागा झाला । तेव्हां ह्मणे मी जागृतीं आला । शेवटीं जागा ना निजेला । असे संचला जैसा तैसा ॥ ३७ ॥ तेविं ज्ञानें निरसलें अज्ञान । निजध्यासे विरे ज्ञानाभिमान । निराभिमानें समाधान । संचलें पूर्ण कोदाटे ॥ ३८ ॥ कोदाटे तें सिद्धचि संचलें । नव्हे तें गेलें नाहीं आलें । सिद्धाचें पूर्णत्वें कोंदलें । साधन सरलें आचार्य ह्मणे ॥ ३९ ॥

**ततः साधननिर्मुक्तः सिद्धो भवति योगिराट् ।**
**ततः स्वरूपासक्तस्य वियोगो मनसा गिरा ॥ ३९ ॥**

ऐका पूर्ण समाधान । सिद्धचि सहज बाणले पूर्ण । करणें राहिलें साधन । स्वानंदघन अखंडित ॥ ४० ॥ खंडित सहज सिद्धस्थिति । योगी पूर्ण स्वानंदमूर्ति । निष्कर्मधर्मे नांदती । अहंकृति नाठवे ॥ ४१ ॥ योगियाचे पूर्ण दशे । निष्कर्मता कैसी असे । कर्म सांडूनि ह्मणती ऐसे । ते पिसे अभिमानी ॥ ४२ ॥ येथें एक ज्ञाता सर्वज्ञ । आणि येका तटस्थ लक्षण । साधननिर्मुक्त आपण । विचरती जाण निष्कर्मधर्में ॥ ४३ ॥ एक तो वृत्ती लयंगत । देहीं जडत्वें तटस्थ । किंचित् देहावरी येत । मागुती बुडती आनंदीं ॥ ४४ ॥ जैसा असे निद्रिस्त । जाग्र होय परी मूर्च्छित । मागुता निद्रे निमग्न होत । व्यापारार्थ नूठवे पैं ॥ ४५ ॥ जड उन्मत्त पिशाच्यवत् । ऐसिये अवस्थेनें दिसत । मन विनटलें सुखांत । उन्मनिस्त सर्वदा ॥ ४६ ॥ ऊष्णें तापला मार्गस्थ । मुरकुंडी घाली साऊलीआंत । येऊं नावडे उष्णांत । सुखें छायेंत लोळत ॥ ४७ ॥ तेवीं संसारतापें तापला । कामक्रोधें आहळला । यावरी साधनीं विनटला । श्रम जाहला व्यावृत्तीनें ॥ ४८ ॥ वृत्ति होउनी देहाकार । इंद्रियें व्यावृत्ति अपार । येणें होय श्रम फार । निर्विकारसार उन्मनीसुख ॥ ४९ ॥ अनुसंधानें आकळोनि । केलें आनंदीं उन्मन । तेथूनि उठवितां वाटे शीण । उन्मनी तल्लीन होउनि असे ॥ ५० ॥ ह्म एक निष्कर्म एक समाधिस्त । सुखीं लोटला उन्मनिस्त । ह्म उन्मनीं अवस्थायुक्त । साधननिर्मुक्त योगियां ॥ ५१ ॥ आणि एक सर्वज्ञ अवस्थारहित । सहज स्वानंदें डुल्लत । भक्ति स्वधर्में तरी करित । वैराग्ययुक्त दिसतसे ॥ ५२ ॥ करतलामलक निजज्ञान । विज्ञानपूर्ण समाधान । अविकार सहजचि आपण । पूर्णत्वें पूर्ण संचलें ॥ ५३ ॥ देही दिसे जैसा देहस्थ । आणि भक्ति

---

१ अभ्यास कर्ता राहिली ( अ ). २ अविकार ( क ). ३ व्यापार ( क ).

स्वधर्मे दिसत । तरी तो कैसा अवस्थारहित । करितां निर्मुक्त कर्म कैसा ॥ ५४ ॥ ये आशंकेची निवृत्ति । बरवी परिसावी हरिभक्ति । अवस्थारहित पूर्ण स्थिति । कर्मी असती निष्कर्म ॥ ५५ ॥ जागृतिमाजी[1] निजज्ञान । देखतो जाण मिथ्याभान । भासतां तरंग मिथ्या जाण । जळाचि पूर्ण एकलें ॥ ५६ ॥ तेंवि जागृतीमाजि दृश्याकृति । वृत्ति नाहे विकारवंती । निर्विकार आत्मस्थिति । असोनि जागृति नाहीं तया ॥ ५७ ॥ जागृतीमाजि वर्णाश्रम । करितां दिसे स्वधर्म कर्म । कर्म करितां नाहीं भ्रम । परब्रह्म अविकार ॥ ५८ ॥ मन असे ब्रह्मस्थितीं । कर्मी ब्रह्मत्वप्रतीति । हे तव निष्कर्मता आइती । ब्रह्मसंवित्ति अविकार ॥ ५९ ॥ सिद्धचि अवघें ब्रह्ममय । येथें कवण कर्ता केलें काय । अथवा आह्मी निष्कर्म स्वयें । हा हीन होय अभिमान ॥ ६० ॥ या प्रतीति पूर्ण ज्ञानियांप्रती । असतां नाहीं हे जागृति । व्यास वसिष्ठ इये प्रतीति । समभक्ति निजयोगें ॥ ६१ ॥ आपण स्वयें आनंदपूर्ण । मनें कल्पावा विषयो कवण । निर्वासना सहज मन । समाधान पूर्णस्थिति ॥ ६२ ॥ ब्रह्माकार असोनि मन । वर्ते क्रियेवरी आपण । परी त्या नाहीं मीपण । नाहीं अभिमान कवणही ॥ ६३ ॥ विराली विपरीत कल्पना । ह्मणोनि ठाव नाहीं भवस्वप्ना । मन होऊनि निर्वासन । समाधाना बिनटलें ॥ ६४ यालागीं जागृती आणि स्वप्न । नाहीं योगियांलागून । आतां सुषुप्तिअज्ञान । तेंहि लक्षण अवधारा ॥ ६५ ॥ नं तुटतां भेदाचें भान । शून्यत्वीं मन होय निमग्न । तरी त्या नांव अज्ञान । सुषुप्ति जाण ऐसें न घडे ॥ ६६ ॥ भंका गुरुरूपें निजज्ञान । निजध्यासें निरसिलें शून्य । अखंड चिदानंदघन । सिद्ध आपण निजयोगी ॥ ६७ ॥ मनीं नाहीं विपरीत भान । अथवा आवरावें नलगे मन । शून्य लोपुनी चिद्गगन । सिद्ध आपण संचला ॥ ६८ ॥ देहीं दिसे अवस्थाभान । परी त्या नाहीं अनुप्रमाण । अवस्थात्रयासि अभिमान । गिळी ज्ञानघनें पैं ॥ ६९ ॥ अवस्थात्रयीं निर्मुक्त । सिद्धचि ज्ञानें अमूर्त । ब्रह्मविद् ब्रह्म शाश्वत । वेद ह्मणती तयातें ॥ ७० ॥ आतां देहत्रयसाक्षी जें ज्ञान । त्या नांव तुर्यावस्था जाण । तें हीं नाहीं त्यालागुनं । दृश्यदृश्येपण अति मिथ्या ॥ ७१ ॥ दृश्यदृश्यपणें न भासे । तथें द्रष्टा कवण कवणा असे । साक्षी होइल कवणें दृशे । ह्मणोनि नसे तुर्यत्वही ॥ ७२ ॥ आणि तुर्यत्व अनुसंधानीं असतां । एकाते जोडे सुखावस्था । ते तुर्येची परिपक्वता । उन्मनता ऐसें घडे ॥ ७३ ॥ आवरूनियां निजमन । स्वयें भोगावा आनंदघन । हें तव पूर्वपक्षीं

---

१ दृश्य ( क ). २ ब्रह्म वंदिती ( क ). ३ स्वधर्मभक्ति ( क ). ४ मनपण ( क ). ५ तुटावें स्वरूपीं अनुसंधान ( क ). ६ रवि ( क ). ७ ज्ञानियां ( क ).

साधन । ज्ञानियांलागुन घडतसे ॥ ७४ ॥ त्यांही सुखाचें गोडपण । जाणे तो द्रष्टा विचक्षण । स्वयें संचला स्वानंदपूर्ण । सुख यालागुन होणें न घडे ॥ ७५ ॥ मनें उन्मनत्वें सुख भोगणें । तोंवरी मन आहे मनपणें । जेथें मनचि घडे स्वानंदघन । सुख मानणें कवणें मग ॥ ७६ ॥ ऐसी सिद्धस्वानंदता । तेथें नाहीं भोग्य भोक्ता । पूर्ण पूर्णत्वें पूर्णता । दुजा ह्मणतां असेना ॥ ७७ ॥ ह्मणोनि तो अवस्थारहित । स्वैरसमाधि स्वानंदस्थित । पूर्णयोगी ज्ञानी भक्त । सिद्ध शाश्वत आत्माराम ॥ ७८ ॥ ऐसा ज्ञानियां निभ्रम । स्वयें आचरे भक्तिधर्म । परी त्या नाहीं कर्तृत्वभ्रम । सज्ञान परम राजयोगी ॥७९॥ त्याचिये उपदेशस्थिति । अपार निजसुख पावती । परी त्या नाहीं अहंकृती । सद्गुरु ह्मणती भक्त तया ॥ ८० ॥ तो परमात्मा परात्पर । सिद्ध योगी निर्विकार । रामकृष्णादि अवतार । गुरुत्वें साचार वंदिति तया ॥ ८१ ॥ तेचि वसिष्ठादि महंत । शुकसनकादि विरक्त । नारद व्यासादिक भक्त । सिद्ध शाश्वत राजयोगी ॥ ८२ ॥ ते साधनीं निर्मुक्त सहज । सिद्धचि पूर्ण योगिराज । त्याचें स्वरूप परमनिज । गुह्य गुज मना वाचे ॥ ८३ ॥ योगियाचें स्वरूप स्वयें । मनपणें अनुभवा न ये । येथें मनपणाचि विलयें । वाचा काय वदों शके ॥ ८४ ॥ तैसी सिद्धस्वरूपस्थिति । योगिये साम्राज्य भोगिती । निजध्यासें पूर्ण प्राप्ति । ह्मणोनि विरक्ति सावध ॥८५॥ सिद्ध आपुलें स्वरूप स्वयें । प्राप्त होवया विलंब काये । येथें गुरुभक्त तन्मय । स्वानंदमय सर्वदां ॥ ८६ ॥ येथें अभक्ता घडे विघ्न । मन स्वरूपीं नव्हे निमग्न । कामक्रोधीं होय भग्न । स्वानंदघन नाकळे ॥८७॥ जालियाही शब्दज्ञान । विघ्नें नुलंघवतीं आपण । श्रीशंकराचार्य सर्वज्ञ । सांगेल लक्षण तयाचें ॥ ८८ ॥

**समाधौ क्रियमाणे तु विघ्नान्यायान्ति वै बलात् ।**
**अनुसन्धानराहित्यमालस्यं भोगलालसम् ॥ ४० ॥**
**भयं तमश्च विक्षेपस्तेजः स्यन्दश्च शून्यता ।**
**एवं यद्विघ्नबाहुल्यं त्याज्यं ब्रह्मविसर्जनैः ॥ ४१ ॥**

जाणोनि बरवें शब्दज्ञान । तैसेंचि होवे निजमन[1]। घडावें पूर्ण समाधान । समाधि साधन करिती जे ॥ ८९ ॥ त्यांत अभक्तातें विघ्नें प्रबळ । अभ्यासेहुनि मनच पळे। कल्पना न सांडी मोकळे । नाना चाळे करीतसे ॥ ९० ॥ स्वस्वरूपीं सावधान । बरवें न धरी अनुसंधान । अनुसंधानरहित जाण । आळसीं निमग्न होतसें ॥ ९१ ॥ आलस्यें वैराग्य न धरी । आलस्यें अनुष्ठान न करी । आलस्यें नाराधी श्रीहरी । दुःखसागरीं आळशी[2] बुडे ॥ ९२ ॥ हरिगुरुचरणीं प्रीति नसे । ह्मणोनि वैराग्य हृदयीं न वसे । यालागीं कवळिला आळसें । लागलें पिसें कळत कळत ॥ ९३ ॥

---

१ सिद्धचि ( क ). २ होंये ( अ ).

आणि विषयभोगाची लालुची । सगळें आयुष्य तिकडे वेंची । सदा सावधान प्रपंचीं । स्वरूपीं कैंची निवृत्ति ॥९४॥ नाना विषयाचें ध्यान । भोगासक्त करी मन । तृष्णा वाढे अतिगहन । वासना दारुण खवळती ॥९५॥ तेथें कामक्रोधाचे महामार । अखंड घडति अनिवार । वरी ज्ञाता दिसे चतुर । अंतरिं घोर रजतम ॥ ९६ ॥ विषयावृत्ति शीण जाला । तेणें जडत्व ये शरिराला । वरी निद्रेचा पडे घाला । निद्रेंत जाहला लय मना ॥९७॥ दिवस जाय व्यावृत्ति । रात्रि जाय सुषुप्ति । कोणें धरावी स्वरूपस्थिति । अज्ञान भ्रांति वाढे तम ॥ ९८ ॥ स्वरूपीं नाहीं अनुसंधान । आलस्ययुक्त तिकडे मन । विषय भोगी सावधान । निद्रा दारुण आणि मोहो ॥ ९९ ॥ येणें वाढलें अज्ञानतम । मनीं विक्षेप अतिभ्रम । सांडूनि स्वरूपस्थिति स्वधर्म । वासने श्रम वाढला ॥ १०० ॥ सिद्धस्थितीचे बोल बोले । मन विषयाकार जाहलें । लौकिक संपादी वरदळे । तेज आगळें दंभानें ॥ १ ॥ वरि वेष सत्पुरुषाचा । अंतरीं घरोबा मैंदाचा । बंड वाद विटंबाचा । मान्यतेचा भ्रम मानी ॥२॥ धरुनि लौकिक महंति । जे जे विषय आवडति । बंधन नाहीं मुक्ताप्रती । ह्मणोनि प्रीति भोगित ॥ ३ ॥ रसस्वादीं लागली गोडी । मनीं चंचळ वासना कांडी । स्थिर न राहे अधघडी । लागली आवडी विषयरसीं ॥ ४ ॥ हरिचिंतनीं आळशी असे । किंचित आलिया सत्त्वदशे । अनुसंधान धरुनि बैसे । तव त्या भासे शून्यत्व ॥ ५ ॥ ह्मणे परमात्मा अलक्ष्य असे । तेथें अनुसंधान घडे कैसें ॥ प्रपंच तरी मिथ्या भासे । अभाव दिसे उभयतां ॥ ६ ॥ एवं जाला नास्तिक भाव । ऐसे विघ्नशून्य स्वभाव । तेथें बुडाला सद्भाव । बोधासि ठाव नुरेची ॥ ७ ॥ नाहीं हरिचरणीं अनन्य । शब्दें शिकला ब्रह्मज्ञान । तया ओढवे ऐसें विघ्न । समाधान घडेना ॥ ८ ॥ एवं ऐसीं विघ्नें बहुतें । ओढवती अभक्तातें । स्वानंद नाकळे त्यातें । अद्वैतमतें अतिवादी ॥ ९ ॥ घोर ऐसीं विघ्नें बहुतें । ब्रह्मविदीं हळुंचि यातें । विवेक वैराग्यें सामर्थ्यें । निजमनातें आकळिजे ॥ १० ॥ स्वधर्म हरिनामस्मरण । हरिचरणीं अनन्य शरण । तया हरि सुप्रसन्न । वैराग्य जाण तो पावे ॥ ११ ॥ तथा निज विवेक केवळ । घडे शम दम निर्मळ । निर्वासना उपरती प्रबळ । होय मगळ हरिकृपें ॥ १२ ॥ निगम महावाक्य प्रमाण । आणि तोचि प्रतीत गुरुवचन । येथें श्रद्धा अनन्य शरण । समाधान निजभावें ॥ १३ ॥ जे जे करी अद्वैत श्रवण । तोचि मनन निजध्यासन । आचार्य ह्मणे सावधान । समाधान सद्भावें ॥ १४ ॥

भाववृत्त्या हि भावत्वं शून्यवृत्त्या हि शून्यता ।
ब्रह्मवृत्त्या हि पूर्णत्वं तया पूर्णत्वमभ्यसेत् ॥ ४२ ॥

---

१ निजवृत्ति ( क ).

हरिगुरुचरणीं अनन्यभाव । त्यातें घडे हा सद्भाव । होती विघ्नें अवघीं वाबो । घडे स्वानुभव सुखसिद्धि ॥ १५ ॥ आणि हरिगुरुचरणीं नाहीं शरण । त्यासीं नाकळे हें समाधान । वृत्ति अज्ञानीं निमग्न । वृत्ति शून्य शून्यत्वें ॥ १६ ॥ अनन्य भक्ताची निजवृत्ति । सावध निजध्यासप्रतीती । ब्रह्माकार पूर्णस्थिति । अभ्यासिती निजयोगें ॥ १७ ॥ सुखें सुखाचें अनुसंधान । सुखें सुखरूप आपण । निष्ठा न धरिती अज्ञान । मूर्ख जाण शंकर ह्मणे ॥ १८ ॥

**ये हि वृत्तिं विहायैनां ब्रह्माख्यां पावनीं पराम् ।**
**वृथैव ते तु जीवन्ति पशुभिश्च समा नराः ॥ ४३ ॥**

धरितां निजध्यास निजस्थिति । जोडे स्वानंदता आइती । हें सांडूनियां अभक्ति[१] ख्याती दाविती शब्दवादें ॥ १९ ॥ ब्रह्मस्थिति परम पावन । संचला पूर्ण स्वानंदघन । हरिहरा वंद्य जाण । उपमा कोण करूं शके ॥ २० ॥ ऐसी जोडतां ब्रह्मस्थिति । मूर्ख जे निजध्यास न धरिती । वायां गेली ते व्युत्पत्ति । ज्ञानत्व ख्याति अति मिथ्या ॥ २१ ॥ वृथा ते नरदेहा आले । मृतप्राय त्याचे जालें । ते अपवित्र वायां गेले । बंदीं पडले भ्रमाचे ॥ २२ ॥ जो नर परम पावन । परी हीन झाला पशुहून । आहारनिद्राभयमैथुन । समाव ज्ञान खरा नरा ॥ २३ ॥ तो नर होता परि खरू । वाहे देह बुद्धि मळभारू । विषय उकरडा जाहला स्थिरू । भुंके थोर अभिमानें ॥ २४ ॥ खाता हाणे तोंडावरी । तरी ते आवडे खरी । अष्टौ प्रहर कष्ट करी । स्वहित दुरी अंतरले ॥ २५ ॥ मर्कट बहुविकारी जैसे । कामना कर्म फळाशें । झाडोझाडीं हिंडे कैसें । सकाम तैसे पशु नर ॥ २६ ॥ धिग् धिग् त्याचे झालें । कट कटा कैसे जाहलें । पावन नरदेह वायां गेलें । दुःख जोडिले अति मूर्खी ॥ २७ ॥ छिः छिः जडो नें लक्षण । बोलिजे तिलुका वृथा शीण । आतां ऐका ते सज्जन । सावधान आचार्य ह्मणे ॥२८॥

**ये तु वृत्तिं विजानन्ति ज्ञात्वा वे वर्धयन्त्यपि ।**
**ते वै सत्पुरुषा धन्या वन्द्यास्ते भुवनत्रये ॥ ४४ ॥**

ब्रह्माकार निजवृत्ति । अनुभवें पूर्ण प्रतीति । बरवा निजध्यास जाणती । जाणोनि करिती वृद्धी ते ॥ २९ ॥ निजात्मता पूर्ण ज्ञान । जाणोनि सर्वदा सावधान[२] । सस्वरूपीं अनुसंधान । स्वानंदपूर्ण स्वयें असती ॥ ३० ॥ धन्य धन्य ते सत्पुरुष । ज्ञानचतुर राजहंस । सांडूनि बुद्धिविषमत्वास । समाधिसुखास भोगिती ॥ ३१ ॥ तेचि सज्ञान हरिभक्त । तेचि विवेकी विरक्त । अनुभावये साधुसंत । सिद्ध अनंत राजयोगी ॥ ३२ ॥ तेचि वंद्य त्रिभुवनीं । सर्व तीर्थां शिरोमणी । सकळ तीर्थें त्याचे चरणीं । पावनपणीं मिरविती ॥ ३३ ॥ ज्याचें

१ ब्रह्मस्थिति ( क ). २ समाधान ( क ).

न्पुम पतीतपावन । ऐसा स्वामी तो श्रीकृष्ण । ह्मणे मी वंदी त्याचें चरण । अवतार जाण त्यालागी ॥ ३४ ॥ त्या पवित्राचें पवित्र दर्शन । त्या पवित्राचें पवित्र स्पर्शन । पवित्र त्याचें क्रियाचरण । अद्वैत भजन हरीचें ॥ ३५ ॥ त्याचिये रूपादृष्टी । नासती पापाचिया कोटी । भवभयाची विरे गाठी । स्वानंदपुष्टि भक्तजना ॥ ३६ ॥ ह्मणोनि ते नरनारायण । वंद्य त्रिभुवनीं आपण । त्याचे लागतां रजःकण । पापे दहन सर्वही ॥ ३७ ॥ त्याचा महिमा अपार । भागवतीं बोलिला सर्वेश्वर । ह्मणऊनी संतचरणीं आदर । त्यातें भवपुर असेना ॥ ३८ ॥ संतचरणीं अनन्यभाव । त्याचा वोळगणा होय देव । अखंड स्वानंद स्वयमेव । पूर्णानुभव सद्भक्तां ॥ ३९ ॥ ज्यांचे स्वरूपीं निजध्यास । सिद्ध योगी ते जगदीश । ब्रह्मरूप ह्मणिजे त्यास । त्रैलोक्यास वंद्य ते ॥ ४० ॥ ऐसी वृत्ति ब्रह्माकार । ते वृद्ध पक्व योगेश्वर । इतर ते शाब्दिक नर । सांग शंकर श्लोकार्थे ॥ ४१ ॥

**एषा वृत्तिः समावृद्धा परिपक्वा च सा पुनः ।**
**ते वै सद्ब्रह्मतां प्राप्ता नेतरे शब्दवादिनः ॥ ४५ ॥**

ब्रह्माकार वृत्ति भरले । सहज समायुक्त आथिले । वृद्ध महंत ते बोलिले । पक्वता पावले निजध्यासें ॥ ४२ ॥ जैसें आंबियाचें फळ । प्रथम आंबट प्रबळ । पाड येतांचि केवळ । मधुर रसाळ होऊं रिघे ॥ ४३ ॥ तिची मुरालिया शेजेसीं । गोडी वोसंडे रसीं । सबाह्य प्रगटतां ऐसी । सुवासेसीं मगमगात ॥ ४४ ॥ तैसेचि हरिभक्त सज्ञान । पावले स्वरूप स्वानंदघन । स्वानंदीं होऊनि निमग्न । स्वानंदपूर्ण स्वयें जाहले ॥ ४५ ॥ अंतरीं विश्रांति बाह्य शांति । सुखमय सहजस्थिति । तोचि सबाह्य स्वानंदमूर्ति । त्रिजगतीं तारक ॥ ४६ ॥ ह्मणउनि निष्ठावंत भले । शाश्वत ब्रह्मत्वा पावले । आणि इतर शब्दवादी जाहले । भुंकत बैसले चौबारा ॥ ४७ ॥ भगवे देखोनियां दृष्टी । द्वेषें श्वान भुंकत उठी । भक्ता देखोनि शाब्दिक हाटी । वाद चावटी करूं धावे ॥ ४८ ॥

**कुशला ब्रह्मवार्तायां वृत्तिहीनाः सुरागिणः ।**
**तेऽप्यज्ञानतया नूनं पुनरायांति यांति च ॥ ४६ ॥**

ब्रह्मवार्ता सांगोनि कुशळ । शब्द व्युत्पत्ति महाप्रबळ । भक्तां न मानी तो अमंगळ । आपण वरिष्ठ केवळ ह्मणवी ॥ ४९ ॥ भक्तसंतसाधुसज्जन । पाषांडी करी त्यांचे छळण । लोकांसि दावी ज्ञातेपण । होवया सन्मान प्रतिष्ठा ॥ ५० ॥ ब्रह्माकार न करी वृत्ति । विषयीं आवडी आसक्ति । सन्मान न होतां दुखावती । पडे भ्रांति अनिवार ॥ ५१ ॥ नाना अपेक्षा काम गहन । अपूर्ण कामें क्रोध दारुण । क्रोधें जाहलें ज्ञानशून्य । तमोगुण सवळला ॥ ५२ ॥ तमें ज्ञाताचि अज्ञान । तेथें कैचें समाधान । त्याचें न चुके जन्ममरण । अनिवार मन देहबुद्धी ॥ ५३ ॥

आतां असो ते ज्ञाते अज्ञान । स्वरूपीं न धरिती अनुसंधान । त्यातें कैचें समाधान । आतां सज्जन आचार्य वदे ॥ ५४ ॥

**निमिषार्धं न तिष्ठंति वृत्तिं ब्रह्ममयीं विना ।**
**तथा तिष्ठंति ब्रह्माद्याः सनकाद्याः शुकादयः ॥ ४७ ॥**

ब्रह्माकार वृत्तीवीण । राहणें नाहीं अर्ध क्षण । सदा सर्वदा सावधान । आपआपण सदोदित ॥ ५५ ॥ ऐसेचि हरिहर ब्रह्मादिक । असती सिद्ध सनकादिक । नारद व्यास शुकादिक । वसिष्ठादिक निजयोगी ॥ ५६ ॥ एक निमिषाचें अर्ध पाहे । वृत्ति ब्रह्माकार राहे । अनंत पुण्य जोडताहे । उरोन लाहे पापलेशु॥ ५७ ॥ तपस्तीर्थ जपज्ञान । पवित्रे तारक आपण । याचेनि पवित्रता न होणें । होय ते ज्ञाने लेष-मात्रें ॥ ५८ ॥ ऐसी ज्ञानाची पवित्र कीर्ती । कृष्ण सांगे उद्धवाप्रति । आणि अर्जुनालागि श्रीपति । माहमा निश्चिती बोलिला ॥ ५९ ॥

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धिः कालेनात्मनि विंदति ॥ ४८ ॥**

ज्ञाना समान पवित्रता । नाहीं हें जाणावें जाणता । स्वयें योग स्वयें सिद्धता । जे काळीं आत्मता जाणिजे ॥ ६० ॥ जे काळीं जाणिजे आत्मज्ञान । तव स्वयेंचि ज्ञानघन । तेथें न भासे मीपण । पवित्र पूर्ण ब्रह्ममय ॥ ६१ ॥ केवढें निमिषाचें पवित्रपण । मा अखंडरूप सावधान । त्याचा महिमा वर्णी कोण । स्वानंदघन निज योगी ॥ ६२ ॥ निमिषार्ध ज्याची वृत्ति । नव्हे कल्पना विकारवंती । स्वानंदसुखें नित्यतृप्ती । स्वयें असतीं स्वराज्यें ॥ ६३ ॥ त्याचेनि हरिभक्ति निर्मळ । त्याचेनि वैराग्य प्रबळ । त्याचेनि ज्ञान सुमंगळ । अवतार केवळ कृष्णाचे ॥ ६४ ॥ ऐसी निष्ठा जयातें । कृष्ण वंदी तयातें । महिमा वर्णवे कवणातें । हरिहर ज्यातें वंदती ॥ ६५ ॥ संतसज्जन श्रीकृष्ण । परम शांतिसुखनिधान । पतीत त्याचेनि उद्धरणें । समाधान सुख-दाते ॥ ६६ ॥ संतचरणीं अनन्यभाव । त्यातें न विसंबे श्रीकृष्णराव । विघ्नें होती अवघी वाव । स्वानुभव सुख सिद्धि ॥ ६७ ॥ संत श्रीकृष्ण स्वयमेव । त्यातें प्रिय अनन्यभाव । अनन्यभावें सुखानुभव । देती अभिनव प्रसन्नपणें ॥ ६८ ॥ हे संत सद्गुरुनाथ । शांत श्रीकृष्ण समर्थ । गुरुस्वरूप गुरुभक्त । मूर्तिमंत ब्रह्ममय ॥ ६९ ॥ अनन्य शरण मी सज्जनास । म्हणोनि प्रिय श्रीकृष्णास । जयराम कृष्णदास । शरण श्रीकृष्णास अनन्य॥ १७० ॥ इति श्रीअपरोक्षानुभव। शंकरोक्ति सुख गौरव। दृढ करणें ब्रह्मानुभव । प्रकरण स्वयमेव नववें । श्रीकृष्णार्पणमस्तु ।

ॐ नमो सद्गुरु पंढरीनाथा । परम कृपाळुवा श्रीअनंता । विठोबा सुख कमन

करितां । कार्यकारणता हरपली ॥ १ ॥ जगत्कार्य पाहतां कैसें । तंव तें कारण नांदत असे । तेणें कार्यत्व निरसे । कारण ह्मणतसें कारणा कवण ॥ २ ॥ पृथ्वीचें कार्य पाहतां घट । कारणत्वें तें[4] पृथ्वीच प्रगट । पृथ्वीमाजी नाहीं घट । न घडे घटा कारणत्व ॥ ३ ॥ तूंचि एकला परिपूर्ण । कार्य कैंचें कारण कवण । पूर्ण संचला स्वानंदघन । निःसीम आपण तूंचि तूं ॥ ४ ॥ तुझें पाहतां तूंपण । माझें न भासें मीपण । मीपण नसतां तूंपण घडे कैसेनि तुजलागीं ॥ ५ ॥ मीपण पाहतां तूंपण आहे । ह्मणऊनि मीपण न राहे । तुज आतां[6] तूंपण पाहें । घडे काय दुजें नसतां ॥ ६ ॥ ह्मणोनि जगत्कार्य जें दिसे । परी येथें जगत्व नसें । तुझी लीलामात्र असें । क्रीडा भासे नसोनि दुजें ॥ ७ ॥ सागरु आपणांत आपण । क्रीडा करी दुजेविण । नानाकार दावी भान । दुजेपणा स्पर्शेना ॥ ८ ॥ तैसा तूं जी पंढरीनाथा । देवभक्तपणें क्रीडतां । तुजमाजी तूंचि अनंता । सामर्थ्यता तुझी तुज ॥ ९ ॥ क्रीडा कौतुक आनंदलहरी । रचिली शुद्धसत्व पंढरी । क्रीडा नवविध प्रकारीं । क्रीडसी हरि समर्था तूं ॥ १० ॥ आपुले आवडी आपण । धरिसी तूं हरि भक्तपण । भक्तिप्रेमाचें गोडपण । भोगिसी जाण तुझेंचि तूं ॥ ११ ॥ आपुल्या मुखातें देखोन । सुखी होइजे आपण । निमित्यमात्र तो दर्पण । दुजें दर्शन नसोनि दिसे ॥ १२ ॥ लीलामात्र भक्त हें नाम । परी तुझा तूंचि आत्माराम । आपुले भक्तीचा संभ्रम । मनोरम[7] क्रीडा तुझी ॥ १३ ॥ भावार्थ हाचि पुंडलीक मुनि । भक्ति भगवंतु जनकजननी । आवडी भक्तशिरोमणि पितृभजनीं निज निष्ठा ॥ १४ ॥ भावार्थभक्तिनिजध्यासीं । तू स्वानंद प्रगटलासी । अखंडता वरु देशी । उभा असशी सबाह्य ॥ १५ ॥ पितृरूपें निज प्रीति । पितृ तूं प्रगटलासी श्रीपति । मातारूपें निज भक्ति । तेचि मूर्ति रखुमाई ॥ १६ ॥ क्षेत्र शुद्धसत्व पंढरपुर । ज्ञानी नांदती धरामर । स्वधर्मभक्ती निजनिर्धार । निरंतर गर्जती ॥ १७ ॥ श्रवण हेंचि महाराऊळ । तेथें घनवटला संतमेळ । हरिकीर्तन गदारोळ । वोळलासि गोपाळ कृपाघन ॥ १८ ॥ आनंदहर्षाच्या कल्लोळीं । नामें गर्जती वाहूनि टाळी । नाचती सुखानंदचहळीं । गर्जती बळी वैष्णववीर ॥ १९ ॥ विवेक भैरव क्षेत्रपाळ । अखंड जागे बळी प्रबळ । द्वैतवृत्ति मारिले बळ । गदा त्रिशूळ झेलितु ॥ २० ॥ अनुभव हाचि गरुडपक्षी । विषय कामादि सर्प भक्षीं । विठोबातें अलक्ष लक्षी । मीपणा रक्षी ऐसा नव्हे ॥ २१ ॥ महाबोध हा हनुमत । धैर्य निर्धार दोन्ही हात । जोडूनि सन्मुख तिष्ठत । राक्षस-

---

१ कारणा ( अ ) २ कार्यत्वें ( क ). ३ कार्य ( अ ). ४ ते हा शब्द ( अ ) प्रतींत नाहीं. ५ निःशेष ( अ ). ६ आंत ( अ ). ७ क्रीडा मनोरम पैं तुझी ( अ ). ८ शुद्ध ( क ). ९ वाजवूनि ( अ ).

अंतकर्ता जो ॥ २२ ॥ ऐसें श्रवण हें राउळ । मुर्खे मिनला वैष्णवमेळ । तेथें मनन हें देउळ । निज निर्मळ लखलखीत ॥ २३ ॥ तेथें निजध्यास विटेवरी । उभा स्वानंदघन श्रीहरि । अखंड नीट निर्विकारी । उपमा करी कोण रूपा ॥ २४ ॥ बाप स्वानंदघन सुंदर । सद्त्वें शोभे निर्विकार । चिद्रत्नाचे अलंकार । पीतांबर पूर्णत्वें ॥ २५ ॥ आणि अनन्यातें कृपा पुरती । जे माउली निजभक्ति । विश्रांति दे भक्ताप्रती । परम शांति रखुमाई ॥ २६ ॥ प्रीति भीमा प्रेमें वाहे । श्रीरुक्मिणी मिनली आहे। सद्भाव पुंडलीक तेथें राहे। उभा सबाह्य श्रीविठ्ठल॥२७॥श्रीविठ्ठल स्वानंदमूर्ति ।रखुमादेवी निज शांति।जनकजननी भावाप्रती। देती विश्रांति निजवरदें ॥२८॥ ज्ञानविज्ञानहीन दीन । धावोनि येती अनन्य शरण । त्यांसि द्यावया मोक्षसदन। उभा रूपेनें श्रीविठ्ठल ॥ २९ ॥ गोपाळ अनुहत वेणू वाहे । चंचळ मना भुलवित आहे । नामें पंढरी गर्जत आहे । परम उत्साहें ठुमठुमित ॥ ३० ॥ महामुक्तिक्षेत्र पंढरी । ब्रह्मानंद घरोघरीं । जियेची वैकुंठ न पवे सरी । सुरनरीं वंदिजेत ॥३१॥ स्वामी सद्गुरु पंढरीनाथ । स्वानंदघन कृपावंत । कृष्ण रूपे ज्यातें पाहत । सुख अनंत तो पावे ॥ ३२ ॥ कृष्णदास जयराम ह्मणे । स्वामी कृष्णा तुजवीण नेणें । मायबाप कृपाळूपणें । आपुलें तान्हें मज ह्मणसी ॥ ३३ ॥ सद्गुरुनाथा अनन्य शरण । रिघतां हरपे कार्य कारण । श्रीशंकराचार्य आपण । सांगे कृपेनें तेचि स्थिति ॥ ३४ ॥

**कार्ये कारणता याता कारणे न हि कार्यता ।**
**कारणत्वं ततो गच्छेत्कार्याभावे विचारतः ॥ ४९ ॥**

निजध्यासें पूर्णत्व जयाप्रती । नाहीं कार्य कारण तयांप्रती । निर्वाण निज आत्मस्थिति । अखंड असती अमेळत्वें ॥ ३५ ॥ त्याचे अंतरीचें मनन । सांगे आचार्य कृपाघन । श्रोता येथें सावधान । निर्वाण खूण आचार्य वदे ॥ ३६ ॥ कार्य पाहतां प्रपंच सकळ । भेदाभेद दिसे बहळ । जैसे समुद्राचे कल्लोळ । भासती प्रबळ जळरूपें ॥ ३७ ॥ पाहतां हें जगत्कार्य पाहें । तंव उघडें कारण आहे । कार्य भावना विरोनि जाय । दुसरें साह्य तेथें कैंचें ॥३८॥ कार्य नसतां कारण । होईल कवणाचें कवण । कर्तृत्व दिसे मिथ्या भान । केल्या विचारण कार्याचें ॥ ३९ ॥ प्रपंच कार्य विचारें कैसें । कारण वस्तु सत्य भासे । कारणामाजि कार्य नसे । कारणत्व कायसें घडे तेथें ॥ ४० ॥ नाहीं कार्य आणि कारण । वस्तु पूर्ण समसमान । अखंड अद्वैत चिद्घन । आचार्य खूण बोधिलु ॥ ४१ ॥

**अथ शुद्धं भवेद्वस्तु यद्वै वाचामगोचरम् ।**
**द्रष्टव्यं मृद्घटेनैव दृष्टान्तेन पुनः पुनः ॥ ५० ॥**

---

१सुंदरत्वें ( अ ). २ करिती ( अ ). ३ स्वात्मस्थिति ( अ ). ४समत्वें ( अ ). ५ राहे ( क ). ६ होईजे ( अ ).

कार्य कारण नाहीं मळ । ऐशी निष्ठा जया प्रबळ । तो शुद्ध वस्तु निर्मळ । जाला केवळ स्वतः सिद्ध ॥ ४२ ॥ मना वाचे अगोचर । वस्तु सिद्ध योगेश्वर । तया दिसता आकार विकार । आहे निर्विकार परमात्मा ॥ ४३ ॥ पाहतां घट कार्य भान । सत्य पृथ्वीच ते कारण । पृथ्वीत नाहीं घटपण । कार्य कारण तेथें कैंचें ॥ ४४ ॥ या घटदृष्टांतें पुनः पुन्हां । विवंचूनि दृढ करीं मनना । अखंड करी निजध्यासना । समाधाना भोगितु ॥ ४५ ॥

**अनेनैव प्रकारेण वृत्तिर्ब्रह्मात्मिका भवेत् ।**
**उदेति शुद्धचित्तानां वृत्तिज्ञानं ततः परम् ॥ ४४**

ऐशिया विचारप्रकारें करून । वृत्ति होय ब्रह्मार्पण । विरोनि विपरीत अभिमान । समाधान सुखरूप सदा ॥ ४६॥ ज्यांचें चित्त अति निर्मळ । जे हरिभक्त परम प्रेमळ । वैराग्य अनुताप प्रबळ । ज्ञानें केवळ सुखसिद्धि ॥ ४७ ॥ शुद्ध प्रेमळाची चित्तवृत्ति । होऊनि अज्ञाननिवृत्ति । ज्ञानउदयो ब्रह्मस्थिति । सुखप्रतीत गुरुकृपे ॥ ४८ ॥ गुरुकृपे ब्रह्मज्ञान । ज्ञानें वृत्ति ब्रह्मार्पण । ब्रह्मार्पणीं समाधान । स्वानंदघन स्वतःसिद्ध ॥ ४९ ॥ सुखसिद्धीची निर्वाण खूण । सांगे आचार्य कृपाघन । प्रेमळा होइजे सावधान । अवलोकन ज्ञानदृष्टी ॥ ५० ॥

**कारणं व्यतिरेकेण पुमानादौ विलोकयेत् ।**
**अन्वयेन पुनस्तद्धि कार्ये नित्यं प्रपश्यति ॥ ४५ ॥**

जैसें पूर्ण असोनि गगन । अलिप्त व्यापक अणुरेणु । तैसें अद्वैत चिद्गगन । कारण पूर्ण एकलें ॥ ५१ ॥ आनंद अप्रमित निर्मळ । प्रपंचाचा नाहीं मळ । सिद्ध स्वानंद केवळ । पूर्ण अमळ अविकारी ॥ ५२ ॥ हें निःप्रपंच कारण । पुरुषें सज्ञानें आपण । नेति मुखें अवलोकन । करावें मीपण जेथें नसे ॥ ५३ ॥ आणि कार्य हें प्रपंचभान । प्रत्यक्ष दिसे विद्यमान । अन्वयव्यतिरेकेंकरून । पाहवे आपण सज्ञानें ॥ ५४॥ कारणापासूनि दिसे कार्य । तें कारण सिद्ध अद्वय । पृथ्वीपासूनि भिंती होय । ते अद्वय पृथ्वीसीं ॥ ५५ ॥ भिंती पाहतां मृत्तिकाचि असे । मृत्तिकेमाजी भिंती नसे । अन्वयें कार्य पाहतां तैसें । व्यतिरेकें दिसे कारणत्वें ॥ ५६ ॥ अन्वय ह्मणिजे जगत्कार्य । कारणवस्तूसि अद्वय । यालागीं कारणचि आहे । व्यतिरेक स्वयें तो ऐसा ॥ ५७ ॥ अन्वयें जनचि जनार्दन । जनार्दनांत नाहीं जन । या नांव व्यतिरेक आपण । निःप्रपंच पूर्ण परमात्मा ॥ ५८ ॥

**कार्ये हि कारणं पश्येत्पश्चात्कार्यं विसर्जयेत् ।**
**कारणत्वं ततो गच्छेदवशिष्टं भवेन्मुनिः ॥ ४६ ॥**

---

१ वाचा ( अ ). २ पृथ्वी तेंचि घटपण ( अ ). ३ जाय ( अ ).
४ व्यतिरेक ( अ ). ५ ऐका ( अ ).

जगत्कार्य पाहतां कैसें। कारण वस्तु मन्य दिसे। कार्य जाणोनि मिथ्या ऐसें। कारणचि असे अविकार ॥ ५९ ॥ कार्य कारणत्वें जाणिजे। जाणोनि कार्यत्व सांडिजे। कारणें एकलेंचि उरिजे। कोणें ह्मणिजे कारण तया ॥ ६० ॥ कार्य नसतां कारण। होईल कवणाचें कवण। ऐशया युक्ति करी मनन। मुनि सज्ञान वरिष्ठ तो ॥ ६१ ॥ ऐसें करोनियां निजात्ममनन। निजध्यासीं निज निर्वाण। योगी सर्वदां सावधान। आचार्य खूण बोधितु ॥ ६२ ॥

**भावितं तीव्रवेगेन यद्वस्तु निश्चयात्मना।**
**पुमांस्तद्धि भवेच्छीघ्रं ज्ञेयं भ्रमरकीटवत् ॥ ४७ ॥**

गुरुरूपे आत्मनिश्चयें। बरवा जाणोनि निःसंदेह। दृश्य द्रष्टृत्व मिथ्यामय। आपण स्वयें पूर्ण ब्रह्म ॥ ६३ ॥ हाचि निजध्यास अंतरी। अनुसंधान[1] सावध धरीं। प्रतीत मनातें आंवरीं। भावनेवरि येऊं नेदीं ॥ ६४ ॥ सदां सर्वदां सावधान। चकोरा चंद्रीं अनुसंधान। कीं मीना न संडवे जीवन। तैसा तल्लीन स्वस्वरूपीं ॥६५॥ कृपण जैसा धनातें। कीं अंध जैसा लोचनातें। तृषार्त जैसा जीवनातें। स्मरतु चित्तें अहर्निशीं ॥ ६६ ॥ ऐशी अनुतापें अनुदिनीं। आंवरीं कल्पनेलागुनि। स्वस्वरूप[2] अनुसंधानीं। सावधपणीं निज निष्ठा ॥ ६७ ॥ जैसे दुकळले भोजनीं। कीं उष्णें तापला तो जीवनीं। कीं कामी लाभें कामिनी। आसक्तपणीं सेवितु ॥ ६८ ॥ चकोरा चंद्रीं अनुसंधान। ह्मणोनि करी अमृतपान। वायसातें नाहीं ज्ञान। विष्ठा शेण भक्षितु ॥ ६९ ॥ तैसे भक्त सज्ञान विरक्त। आत्मार्चनें सदा भजत। सद्भावेंसि योगयुक्त। अखंड ध्यात निज निष्ठे ॥ ७० ॥ अत्यंत तीव्र भावना। सोहं सिद्धि लागली मना। प्रत्यग्वृत्ति दृढधारणा। तादात्म्यपणा मन पावे ॥ ७१ ॥ पुरुषा जें जे तीव्र ध्यान। तें तें प्राप्ति पावे जाण। जें जें प्रीतीं ध्याये मन। तेंचि आपण स्वयें होय ॥ ७२ ॥ तीव्रयोगें करी ध्यान। निजात्मप्रतीति अनुसंधान। पुरुष शीघ्रचि तें आपण। होय जाण निजध्यासें ॥ ७३ ॥ जैशी कीटकी भ्रमरीतें। भयें स्मरे तीव्रचित्तें। भ्रमरीपण देहातें। होऊनि उडते प्रत्यक्ष ॥ ७४ ॥ कीटकी भ्रमरीचें ध्यान। लागतां आलें भ्रमरीपण। हा तवें[3] सिद्धात्मा आपण। होवया पूर्ण विलंबु काये ॥ ७५ ॥ पुन्हां तेचि निजात्मखूण। आचार्य सांगे दृढीकरण। स्वस्वरूपीं अनुसंधान। सावधान असावें ॥ ७६ ॥

**अदृश्यं भावरूपं च सर्वमेव चिदात्मकम्।**
**सावधानतया नित्यं स्वात्मानं भावयेद्बुधः ॥ ४८ ॥**

---

१ अनुसंधानें सावध करी (अ). २ सुखस्वरूप (अ).
३ तरी सिद्ध आत्मा (अ).

अज्ञानें देहीं देहाभिमान । देहाभिमानें विपरीत ज्ञान । तेथें कैंचें समाधान । दृश्य भान सत्य दिसे ॥ ७७ ॥ सद्गुरुनाथा अनन्य शरण । उदयो झाला ज्ञानसुभान । निशी हरपली अज्ञान । दृश्य भान अति मिथ्या ॥ ७८ ॥ शिंपीपोटीं रजत दिसे । दिसे परी तें कांहींच नसे । जग दृश्य दिसे तैसें । परी तें असे अदृश्य ॥ ७९ ॥ दृश्य ह्मणिजे वृत्तिभान । अदृश्य आत्मा ज्ञानघन । पाहतां आपुलें पूर्णपण । दृश्य पूर्ण अदृश्य[1] ॥ ८० ॥ दृश्य पाहतां अदृश्य असे । अदृश्यामाजी दृश्य नसे । चिदात्मा मां सर्व वसें । दृश्य न दिसे द्रष्टेपणेंही ॥ ८१ ॥ येथें सर्वदा सावधान । नित्य शाश्वत अनुसंधान । स्वात्मा[3] मी चिद्घन । भावना पूर्ण पूर्णत्वीं[2] ॥ ८२ ॥ प्रत्यक्ष दृश्य देखावें । आणि तें अदृश्य कैसें ह्मणावें । ऐशी आशंका उद्भवे । आचार्य अनुभवें पुन्हां सांगे ॥ ८३ ॥

**दृश्यं ह्यदृश्यतां नीत्वा ब्रह्माकारेण चिन्तयेत् ।**
**विद्वान्नित्यसुखे तिष्ठेद्धिया चिद्रसपूर्णया ॥ ४९ ॥**

अज्ञानबुद्धीनें आपण । धरिलें देहाचें मीपण । इंद्रियद्वारा विषयज्ञान । दृश्यभाव सत्य दिसतसे ॥ ८४ ॥ खुंट नेणतां दिसे चोरु । तेणे भयाचें अवडंबरू । भयें रिघे शंख करूं । धांवणें थोरु काढिलें ॥ ८५ ॥ तंव जाला सूर्योदय । पाहतां चोरु ना न होय । वृक्षाचा खुंट आहे । चोरभय मावळलें ॥ ८६ ॥ तैसें जालिया निजात्मज्ञान[4] । आपण आत्मा ब्रह्म पूर्ण । दृश्या न देखे दृश्यपण । निज निर्वाण अदृश्य ॥ ८७ ॥ मजवीण . णिक असावें ॥ तरी म्यां दृश्य देखावें । अथवा मज दृश्य करावें । तरी अनुभवें दुजें नसे ॥ ८८ ॥ अथवा आपणातें आपण । मीच दृश्य द्रष्टेपणें । तरी हेंही न घडे प्रमाण । बैसे कवण कवणावरी ॥ ८९ ॥ सूर्यातें काय सूर्योदय । होऊनि भेटावें लागे स्वयें । जागा जागृत व्हाव. काय । चाखतां नये रसें रसु ॥ ९० ॥ तेविं स्वात्म्याचि[5] आपण । न घडे दृश्यद्रष्टेपण । एवं दृश्य नाहीं प्रमाण । अदृश्य पूर्ण ब्रह्म[6] मी ॥ ९१ ॥ एवं दृश्य नाहीं सत्य । अदृश्य आत्मा अवघा नित्य । पूर्ण ब्रह्म मी सदोदित । चिंतावें पूर्ण स्वतःसिद्ध ॥ ९२ ॥ यया ब्रह्मात्मचिंतनें करी । अखंड निजध्यासधारणा धरी । ज्ञानिया सुख गगनभरी । असे निर्धारीं निज निष्ठा ॥ ९३ ॥ त्या ज्ञानियाची बुद्धि । सांडून अज्ञान देहबुद्धि । ज्ञानें चिद्रूप झाली बुद्धि । समसमाधि परिपूर्ण ॥ ९४ ॥ दृश्य पाहतां अदृश्य दिसे । अदृश्यामाजी दृश्य नसें । अदृश्य आपणा आपण ऐसें ।

---

१ अद्वय ( अ ). २ पूर्णपणें ( अ ). ३ स्वामी मी चिदानंदघन ( अ ). ४ आत्मज्ञान ( अ ). ५ स्वात्मत्वीं ( अ ). ६ आत्मत्वीं ( अ ).

भावणें[1] भासे मिथ्यत्व ॥ ९५ ॥ ऐशी सिद्ध ब्रह्मस्थिति । आपुली आपण[2] आइती । निजध्यासें निष्ठा धरिती । तेचि असती स्वतःसिद्ध ॥ ९६ ॥ येव्हडें स्वानंदस्वराज्य[3] । परमात्मपदवी साम्राज्य । पहीं[4] आळसीं केलें त्याज्य । भक्ता सहज निजभक्ती॥९७॥ येथें अभक्तालागीं विघ्न । शिकालियाही ब्रह्मज्ञान । आलस्ययुक्त होय मनें[5] । न घडे पूर्ण स्वरूपस्थिति ॥ ९८ ॥ मग शब्दज्ञानें थोरींव धरी । ध्यान विषय लालुचि वरी । निसंग असंड निद्रा करी । नाहीं अंतरी हरिप्रेम ॥ ९९ ॥ रिकामा होतां एक क्षण । आलस्य निद्रा अति दारुण । स्वरूपीं कैंचें अनुसंधान । अज्ञानीं निमग्न तमांध ॥ १०० ॥ मन विक्षेपें प्रपंचाकार । स्थिर नाहीं वणवण फार । तेज दंभाचें[6] दुस्तर । शिश्नोदरपरायण ॥ १ ॥ विषयरसीं लागे प्रीति । निजध्यास[7] तोचि चित्तीं । मन अज्ञान शून्यत्वीं । स्वरूपस्थिति तेथें कैंची ॥ २ ॥ ऐशीं विघ्नें बहुतें । न कळे भ्रांति अभक्तातें । शिकलें ज्ञान वृथा त्यातें । धरी अहंते तेंही विघ्न ॥ ३ ॥ ज्ञानचि अज्ञानत्वें घडलें[8] । अभक्ता विघ्नत्वरूपें फळलें । जाणींव धरूनि पिसाळलें । भुंकत बैसलें पाषांडें ॥ ४ ॥ सर्व ब्रह्म हा आधार धरी । भक्ता वैराग्या धिःकारी । अधर्म स्थापी लोकांतरीं । क्रिया आसुरी आवडली ॥५॥ आह्मी ज्ञानी गुणातीत । ह्मणोनि विधीतें न मानित । विषयकामक्रोधें भ्रांत । हळहळी चित्त दुश्चितपणें ॥ ६ ॥ असो हे परती अभक्तस्थिति । भक्ता ज्ञानिया सुखप्राप्ति । आत्मारामीं जडली वृत्ति । सुखसंवित्ति सर्वदां ॥ ७ ॥ भक्त न सोडिती अनुसंधान । आलस्य नाहीं अणुप्रमाण । भोगीं आसक्त न करी मन । सावधान स्वस्वरूपीं ॥ ८ ॥ भजन साधनें आवडे । आळस निद्रा हें नावडे । अज्ञानें तमांत न पडे । विक्षेप न घडे मनातें[9] ॥ ९ ॥ दंभ न धरी देहबुद्धी । गुंतों नेणें विषयस्वादीं । मन निमग्न आनंदीं । समसमाधि निजनिष्ठे[10] ॥ १० ॥ ह्मणोनि हरिभक्ता सज्जना । शून्यत्व नाहीं जया मना । वृत्ति जडली अद्वैत भजना । समाधाना भोगितु ॥ ११ ॥ भक्त भगवंतीं अनन्य शरण । परम प्रिय हरीलागून । त्यांसि बाधूं न शके विघ्न । स्वामी श्रीकृष्ण कृपाळू तयां ॥ १२ ॥ वैराग्य गदा ज्ञान सुदर्शन । हातीं धगधगित घेऊन । सबाह्य रक्षिता श्रीकृष्ण । विघ्न तें भग्न हरिनामें ॥ १३ ॥

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ५० ॥**

---

१ भावने ( अ ). २ आपणानें (अ). ३ स्वानंदस्वरूपराज्य ( अ ). ४ पाहतां ( क ). ५ मनन ( अ ). ६ तमाचें ( अ ). ७ विषयनिजध्यास ( अ ). ८ ज्ञानेंचि अज्ञानत्व लाधलें ( अ ). ९ विघ्नांतें ( अ ). १० सावधान (अ).

जेथें योगियांचा योगेश्वरु । परम कृपाळू श्रीसद्गुरु । श्रीकृष्ण परमात्मा सर्वेश्वरु । सारंगधरु रक्षिता ॥ १४ ॥ येथें भावार्थ हाचि अर्जुन । धैर्य निर्धारीं अनन्य । कृष्णरूपे विजयी पूर्ण । सारथी श्रीकृष्ण जया असे ॥ १५ ॥ श्रीकृष्णरूपे भावार्थ अर्जुन । सुखें सदा विजयी पूर्ण । विवेक धनुष्य वैराग्य बाण । संसाररण विभांडिलें ॥ १६ ॥ जेथें श्रीकृष्ण योगेश्वरु । जेथें पार्थ धनुर्धरु । तेथें सुख श्री विजय पारु । होय सत्वरु अविलंबें ॥ १७ ॥ विजयश्रियेचा निज वर । जेथें रक्षिता सारंगधर । दासी विजयश्री सादर । चरण सकुमार न सोडी ॥ १८ ॥ संजयो बोलिला हें गर्जोन । ध्रुव अढळ माझें वचन । विजयश्री श्रीकृष्णचरणें । मतिस्फुरण शाश्वत ॥ १९ ॥ ह्मणोनि हरिभक्त ते सज्ञान । तयां प्राप्ति देता श्रीकृष्ण । तिकडे पाहों न शके विघ्न । सावधान निजरूपे ॥ २० ॥ निराभिमान परम शांत । श्रीकृष्णस्वरूप श्रीकृष्णभक्त । ज्याचिये कृपेनें पतित । पावन होती त्रिभुवनीं ॥ २१ ॥ हर्ष विषाद नाहीं ज्याला । मानापमान मिथ्या ज्याला । निंदा स्तुति नलगे त्याला । अरिमित्रां आला समानत्वा ॥ २२ ॥ निरपेक्ष निर्वैर निर्विकार । मननशील मुनेश्वर । सदा स्वानंदें निर्भर । शांत गंभीर निजयोगी ॥ २३ ॥ ह्मणोनि भक्त सर्वदा निर्विघ्न । करिता स्वामी श्रीकृष्ण । अखंड शांति समाधान । स्वानंदघन सर्वदा ॥ २४ ॥ भक्त श्रीकृष्णातें आवडते । विघ्न स्पर्शों न शके तयांतें । भोगिती स्वानंदसुखातें । तेचि दीनांतें दान करिती ॥ २५ ॥ महिमा अनंत अपार । भागवतीं वर्णी सारंगधर । ह्मणोनि सत्संगीं आदर । तयां भवपूर असंचिना ॥ २६ ॥ सत्संगीं नाहीं प्रीति । तयां नुल्लंघवे भवभ्रांति । नाना साधनीं काय करिती । आधीं गुंतती अभिमानें ॥ २७ ॥ संतकृपे साधन करीं । तोचि तरे मायापुरीं । तयातें रक्षिता श्रीहरि । अवतार धरी युगायुगीं ॥ २८ ॥ ते कैशी साधनविधि । जेणें होय समसमाधि । पुढिले प्रकरणीं कृपानिधि । आचार्य बोधी परियेसा ॥ २९ ॥ जयराम श्रीकृष्णा शरण । चरणीं वाहिलें मीपण । विजय श्रीकृष्णचरण । स्वानंद पूर्ण स्वराज्य ॥ ३० ॥ इति श्रीअपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुखगौरव । ब्रह्मस्थिति दृढानुभव । प्रकरण स्वयमेव दहावें ॥ १३१ ॥

ॐ नमो सद्गुरु सदाशिवा । परमेश्वरा महादेवा । सिद्ध शांता कृपाळुवा । सुखानुभवा दातया ॥ १ ॥ सिद्ध योगी परम शांत । सकळां स्वामी तूं गुरुनाथ । स्वानंदसुख अनंत । कृपावंत तूं देसी ॥ २ ॥ गुणातीत [illegible] । भक्तां यावया अपार -

१ वचन ( अ ). २ कृष्णकृपे. ३ अरिमित्र ज्याली [illegible] ( अ ).
४ निरंतर ( अ ).

ह्मणोनि रचिलें त्वां शिखर । शंभु तूं उदार कृपाळुवा ॥ ३ ॥ भक्तिभीमेचे दक्षिणतीरीं । ज्ञानकृष्णेच्या उत्तरपारीं । वैराग्यमानदेशाभीतरीं । कूटस्थशीखरीं वास तुझा ॥ ४ ॥ भक्तिज्ञानवैराग्ययुक्त । शिवस्वरूप शिवभक्त । त्यांचा देह हाचि येथ । कोथळपर्वत लिंगमय ॥ ५ ॥ तेथें सद्भावबळें बळिवंत । बळिये गोळी महाभक्त । भक्तिभावें भाग्यवंत । असे नांदत प्रेमळु ॥ ६ ॥ त्यांतें आवडी भेटावया । सिद्धाचे प्रकटशी शंभुराया । सद्गुरुरूपें कृपालया। सुख द्यावया स्वानंदु ॥ ७ ॥ शुद्धसत्वाहूनि सुंदर । निर्मळतनु कर्पूरगौर । शांतिविभूतिधूसर । दिगंबर शोभसी ॥ ८ ॥ गगनाहूनि विस्तीर्ण थोर । अद्वय शोभे जटाभार । स्वरूपस्थिति गंगाधर । बोधचंद्र भाळीं वसे ॥ ९ ॥ भक्त निरौभिमान निर्मळ । गळां अद्वय रुंडमाळ । कुंडलें माळा हे प्रेमळ । नाग निर्मळ निर्विषय ॥ १० ॥ निष्कामगजचर्मपरिधान । निर्वैर आवडे व्याघ्राजिन । नंदी ब्रह्मानंदु आपण । सिद्धासन सहजस्थिति ॥११॥ चंडी भृंगी गजानन । वीरभद्र षडानन । शिवस्वरूप शिवगण । गर्जती पूर्ण स्वानंदें ॥ १२ ॥ सहित ब्रह्मा सारंगधर । दत्तात्रेयादि मुनीश्वर । देव किन्नर विद्याधर । कृपेश्वर सर्वही ॥ १३ ॥ उमा निजांगीं निज शांति । सहित शोभसी कृपामूर्ति । वेद बंदीजन वर्णिती । उदार कीर्ति शंभो तुझी ॥१४॥ ऐसा तूं सद्गुरु उदारु। प्रगटलासि सर्वेश्वरु । महिमा अनंत अपारु । नव्हे गोचरु श्रुतिशास्त्रा ॥१५॥ बळी भावार्थी अनन्य । तया बोळसी कृपाघन । स्वानंदशिखरीं आलिंगन । दिधलें कृपेनें कृपाळुवा ॥ १६ ॥ निरसूनियां कार्यकारण । नुरवूनियां मीतूंपण । केला स्वानंदीं निमग्न । कृपा पूर्ण त्वां केली ॥ १७ ॥ स्वानंदशिखरीं शंभुराजा । नांदसी तूं सद्गुरु माझा । श्रीशांता महीभोजा । सिद्धा सहजा स्वानंदा ॥ १८ ॥ अहो जी स्वामी सदाशिवा । श्रीशांता महादेवा । तुझिये चरणीं सद्भावा । सिद्ध विसांवा सुखाचा ॥ १९ ॥ विसांवा सद्गुरु तुझे चरण । येणें सर्व विघ्नें निर्विघ्न । स्वानंदस्वराज्यसमाधान । अक्षय पूर्ण निजभक्तां ॥ २० ॥ पूर्ण ज्ञातृत्व तीव्र प्रकाश । हाचि येथें चैत्रमास । शांतिसुख योगियांस । आवडे शिवास शीतळत्व ॥ २१ ॥ शीतळोदकाच्या कावडी । भरिलें शांति सुख आवडी । त्यातें भेटावया तांतडी । धांवशी उडी घालूनियां ॥ २२ ॥ शांति सुखजीवन।अभिषेक करिती तुजलागुन।शांतिसुखें तुष्टमान । स्वानंदघन तुष्टसी ॥२३॥ तूं शांत परमनिधान । महागुरु स्वानंदघन । शांत स्वरूप हे सज्जन । प्रिय अनन्य तुज-

---

१ कोथळलिंग पर्वतमय (अ). २ सद्गुरुरूपे कृपाळुवा (अ).

३ निराभिमानी (अ). ४ कुंडलमाळा. ५ शांतेश्वरु (अ).

६ महाराजा (अ). ७ पूर्ण (अ). ८ घालिशी उडी स्वानंदें (अ). ९ तूं होसी (अ).

लागीं ॥२४॥ [1]त्या अनन्याचें निरोपण । दशम प्रकरणीं निरोपून । तुझिये रूपेनें निर्विघ्न । स्वानंद पूर्ण ते भोगिती ॥ २५ ॥ आतां अकरावें प्रकरण । सांगे आचार्य कृपाघन। गुरु दैवत ज्यांलागून । तेचि अनन्य र जयोगी ॥ २६ ॥ राजयोगी अनन्य भक्त । ज्यांसि सद्गुरु परम दैवत । सुलभ तयां प्राप्ति असत । स्वानंद भोगिती सर्वदां ॥२७॥ आणि मोक्ष व्हावा ऐशी बुद्धि । परि पूर्ण नाहीं चित्तशुद्धि । त्यासि हठयोगें समाधि । सांगे विधि आचार्य ॥ २८ ॥

**एभिरङ्गैः समायुक्तो राजयोग उदाहृतः ।**
**किञ्चित्पक्वकषायाणां हठयोगेन संयुतः ॥ ५१ ॥**

मागें आठवें प्रकरण । बोलिला आचार्य कृपाघन । पंधरा आंगीं निजध्यासन । करिती सज्जन गुरुरूपे ॥ २९ ॥ ये[2] पंधरा आंगे समायुक्त । परम सज्जन साधुसंत । स्वानंदसुखातें भोगित । ते परम शांत राजयोगी ॥ ३० ॥ [3]राजयोग निज निर्वाण । भक्ता विरक्तांलागी आपण । पंधरा आंगीं निजध्यासन । जाली संपूर्ण सुखसिद्धि ॥३१॥ भक्तां साह्य परमानंदु । ह्मणोनि पावती स्वानंदु । विघ्नें तयां न शकती बाधूं । बोलिला गोविंदु श्रीगीते ॥ ३२ ॥

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ ५२ ॥**

पदार्थीं जयांतें विरक्ति । लटिकें चिंतन न करिती । अनन्य मजचि चिंतती । पूर्ण प्रीप्ति आत्मत्वें ॥ ३३ ॥ ऐसे माझे भक्तजन । ऐक्यें भजती मजलागून । हातीं घेऊनि सुदर्शन । सबाह्य पूर्ण मी रक्षीं ॥ ३४ ॥ ऐक्यें माझ्या ठायीं युक्त । परम प्रिय माझे भक्त । त्यांतें निर्विघ्न मी रक्षित । क्षेम वाहत योग त्यांचा ॥ ३५॥ क्षेम वाहें त्यांचा योग । भोगवीं सुखानंद भोग । त्यांसि मज नाहीं वियोग । निज निजांग ते माझे ॥ ३६ ॥ ह्मणोनि पंधरा आंगीं सत्य । बोलिला राजयोग युक्त । राजयोगी विरक्त[5] । स्वानंद भोगित सर्वदां ॥३७॥ आणि जया नाहीं अनन्य भक्ति। चोखट नाहीं विरक्ति । पूर्ण शुद्धता नाहीं चित्तीं । साधनीं प्रीति[4] धरी तुझे ॥ ३८ ॥ मोक्षा व्हावा आपणातें । शरण जावें श्रीगुरूतें । कांहीं करावें साधनातें । व्यर्थ जातें[6] नरदेह ॥ ३९ ॥ हा मध्यम अधिकारी पाहें । मोक्षातें वांछिताहे ॥ साधनीं आंगवण धरिता हे । बरवा राहे उद्यत ॥४०॥ हठयोग बोलिला तयाप्रती ।

---

१ त्या अनन्याचेनि आपण । दशम प्रकरणीं निरोपण । तुझिये कृपे निर्विघ्न । स्वानंद पूर्ण भोगिती ॥ २५ ॥ ( अ ). २ एवं ( अ ). ३ या चरणाचे आरंभीं ' हा ' हा शब्द (अ) या प्रतींत जास्त आहे.

४ प्रीति ( क ). ५ विरक्त भक्त ( अ ). ६ जात ( अ ).

तेणें निर्मळत्व घडे चित्तीं । बरवी धरूनियां विरक्ति । साधनयुक्ति करावी ॥ ४१ ॥ तेचि पंधरा अंगें आपण । हठयोगयुक्ति निरोपण । साधकीं पाविजे समाधान । सावधान आचार्य ह्मणे ॥४२॥ हें तप ऋषि आचरती । ह्मणोनि समर्थ त्रिजगती । त्रिभुवनीं पवित्र असती । पूज्य होती पावन ॥४३॥ जैसा उदिमी करी उदिमातें । आणि मेळवी द्रव्यातें । तंव तंव समर्थ त्यातें । ह्मणती निरुतें सदैव ॥ ४४ ॥ तेविं साधनयोगेंकरून । साधक होती पावन । ह्मणोनि आचार्य आपण । हठयोग संयुक्त ह्मणे ॥ ४५ ॥ ह्मणोनि पंधरा अंगें आपण । हठयोग युक्ति निरोपण । साधकीं परिसावें श्रद्धेनें । अनुक्रमें जाण [1]ते स्थिति ॥ ४६ ॥ यम नियम त्याग मौन । देश काळ आसन । मूळबंध देहसमान । अवलोकन दृष्टीचें ॥ ४७ ॥ प्राणायाम प्रत्याहार धारणा । आत्मध्यान समाधिपणा । यया पंधरा लक्षणां । समाधान साधनविधि ॥ ४८ ॥ यया साधनीं समाधि पूर्ण । स्वयें होइजे स्वानंदघन । करिती [2]ते धन्य धन्य । सावधान निज निष्ठा ॥ ४९ ॥ भागवतीं एकादशीं जाण । एकोणिसावे अध्यायीं निरोपण । स्वामी बोलिला श्रीकृष्ण । यमनियमलक्षण बारा बारा ॥ ५० ॥

अहिंसा सत्यमस्तेयमसङ्गो ह्रीरसञ्चयः ।
आस्तिक्यं ब्रह्मचर्यं च मौनं स्थैर्यं क्षमाऽभयम् ॥ ५३ ॥

काया वाचा आणि मनें । हिंसा सर्वथा नाहीं करणें । सत्य तें सत्याचि बोलणें । परमार्थपणें हरिकीर्ति ॥ ५१ ॥ काया वाचा आणि मनें । चोरी सर्वथा नाहीं करणें । कुसंग सर्वथा न धरणें । सत्संग करणें असंगत्वें ॥ ५२ ॥ लज्जा द्विविध असे जाण । निंद्य कर्म न करी आपण । निंदीना आणिकालागून । निःशंक[3] स्मरण हरिकथा ॥ ५३ ॥ सत्य परमात्मा एक स्वयें । आस्तिक्यभाव निज निश्चयं[4] । सकाम वृत्ति नातळे स्वयें । ब्रह्मचर्य या नांव ॥ ५४ ॥ वाउगें नों[5] बोलावें वचन । कीर्तन स्मरण या नांव मौन।स्थैर्यत्वें एकाग्र चिंतन । भगवंतीं मन एकाग्र करी॥५५॥ पराचा अपराध साहणें । निर्वैर क्षमा यातें ह्मणणें । परातें भय दावूं नेणें । निर्भय आपण हरिपायीं ॥ ५६ ॥ या नांव ह्मणिजे बारा यम । आचरती ते पावन परम । त्यांतें कृपाळु सर्वोत्तम । आतां नियम परियेसा ॥ ५७ ॥

शौचं जपस्तपो होमः श्रद्धाऽऽतिथ्यं मदर्चनम् ।
तीर्थाटनं परार्थेहा तुष्टिराचार्यसेवनम् ॥ ५४ ॥

सांगोनियां बारा यम । देव सांगे बारा नियम । हा सज्जनांचा स्वधर्म । परिसा

१ सहजस्थिति ( अ ). २ जे ते ( अ ). ३ निःशेषस्मरण ( अ ).
४ आस्तिक्यें भावी ( अ ). ५ न बोले ( अ ).

अनुक्रम तयांचा ॥ ५८ ॥ शौच तो द्विविध निर्मळ । विवेकें क्षाळी वासनामळ । शरीरशुचित्व केवळ । दुजा अमळ हा शौच ॥ ५९ ॥ सहस्रनाम आणि यंत्राचें । नेम करावे परे वाचे । आवडी एकाग्र साचें । हें जपाचें निजरूप ॥ ६० ॥ तप हरिनामें स्वधर्माचरण । हें पूर्व प्रकरणीं निरोपण । स्नान संध्या देवतार्चन । नेमावें नेम हरिपायीं ॥ ६१ ॥ ब्राह्मणमुखीं करावा होम । वैश्वदेव अग्निहोत्र उत्तम । श्रद्धा ह्मणिजे आवडी परम । पूर्ण प्रेम हरिगुरुचरणीं । ६२ ॥ अतीत हा भगवंत आपण । अनन्य भावें करी पूजन । घरा आला जो श्रमोन । श्रम निवारणें यथाशक्त्या ॥६३॥ देव द्विज गुरु प्राज्ञ । अनन्य भावें करी पूजन । मानसपूजा करी ध्यान । सावधान आवडी ॥ ६४ ॥ तीर्थयात्रेप्रती जाय । पदोपदीं नाम गाय । साधुसंतां अनन्य होय । हृदयीं पाय आलिंगी ॥ ६५ ॥ परोपकारालागीं पाहें । सुख मानी कष्टतां देहे । परहितीं तत्पर आहे । पुण्यात्मा होय सुश्लोक ॥६६ ॥ ऐशिया रीती घडे भजन । तेणें होय संतुष्ट पूर्ण । आवडी करी गुरुसेवन । प्रीति अनन्य गुरुचरणीं ॥ ६७ ॥ सद्गुरूचें जें सेवन । हेंचि माझें मोक्षसदन । सद्गुरु परमात्मा पूर्णघन । भावार्थ अनन्य गुरुचरणीं ॥६८ ॥ विकिला अंकिला गुरुचरणीं । परम हरिखु गुरुसेवनीं । देहातें कुरवंडी करूनि । सर्वदा भजनीं तत्पर ॥ ६९ ॥ ऐसे बारा यम बारा नियम । जो धर्मनिष्ठ करी स्वधर्म । त्यातें कृपाळू सर्वोत्तम । पूर्ण काम करी सकळ ॥७०॥ आचार्य बोलिले यम नियम । त्यांचा दाविला अनुक्रम । आतां त्यागातें परम । सांगे सर्वोत्तम श्रीशंकरू ॥ ७१ ॥ त्यागूनि आणिक व्यवसाव । गुरुवाक्य निष्ठें सद्भाव । देहसंबंधियांचा गांव । त्यागूनि स्वयमेव निष्ठा धरी ॥ ७२ ॥ यावरी मौन्याचें लक्षण । न बोले प्रपंचिकवचन । अखंड करणें हरिस्मरण । पडतां विस्मरण अनुतापे ॥ ७३ ॥ जनसंगें न घडे साधन । न लागे स्वरूपीं अनुसंधान । ह्मणोनि अनुतापीं पूर्ण । एकांतसेवन करितसे ॥ ७४ ॥ देश ह्मणिजे एकांत निजन । पवित्र प्रशस्त निर्मळ स्थान । तये एकांतीं अनुसंधान । सावधान करीत असे॥७५॥प्रातःकाळीं करी स्नान । यावरी करी हरिध्यान । रिकामा जाऊं नेदी क्षण। श्रवण कीर्तन स्मरण करी ॥ ७६ ॥ एकांत सेविलियाही पाहें । मन जरी स्थिर न राहे । कल्पना धरी उठोनि जाय । ह्मणोनि स्वयें अनुतापी ॥ ७७ ॥ ह्मणे काय करूं या मना । न संडी वाउगी कल्पना । अगा हे स्वामी श्रीकृष्णा । नको मज दीना उपेक्षूं ॥ ७८ ॥ मज पाहे कृपेंकरून । स्थिर करी चंचळ मन । तुज मी आलों अनन्य शरण । अनाथ

---

१ क्षाळिजे ( अ ). २ नेमावें मन ( अ ). ३ यथाशक्ति ( अ ).
४ त्यागु तो ( अ ). ५ मौनाचें ( अ ).

दीन मी तुझें ॥ ७९ ॥ ऐशिया अनुतापें आपण । एकांतीं घाली आसन । भूमि बरवी शोधून । वरी आंथरुण कुशांचें ॥ ८० ॥ त्यावरी व्याघ्राजिन कां मृगाजिन । कां घाली शुभ्र कंबळासन । वरी वस्त्रघडी घालून । त्यावरी वज्रासन घालावें ॥ ८१ ॥ बरव्या युक्ताहारें असोन । गुदालिंगांचें मध्यस्थान । तेथ उजवी टांच देऊन । वामचरण त्यावरी दृढ ॥ ८२ ॥ ऐसा मूळबंध देऊन । त्यावरी काया सम राखोन । नाभि करावें आकोंचन । वोडियाना जाण हा बंध ॥ ८३ ॥

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ ५५ ॥

बरवा नीट पृष्ठीभाग । समसमान राखावें अंग । घंटिकेवरी हनुवटी सांग । नीट अव्यंग शिरकमळ ॥ ८४ ॥ या नांव जालधरबंधु । ऐसा नेटका त्रिबंधु । अभ्यासें साधावा विशदु । सांगे गोविंदु श्रीगीते ॥ ८५ ॥ सोडूनि दश दिशांचें अवलोकन । अर्धोन्मीलित करावे नयन । नासिकाग्रीं अवलोकन । तन्मय मन सोहपणें ॥ ८६ ॥ त्यापूर्वी आसनीं बैसोन । करावें प्राणसंयमन । स्थिर जालिया प्राण । राहे मन स्थिरत्वें ॥ ८७ ॥ त्या प्राणायामाचे भेद । करावे आहेति त्रिविध । रेचक पूरक कुंभक विविध । परिसा सावध अनुक्रमें ॥ ८७ ॥ ॐ ह्मणिजे ब्रह्माकारस्फुरण । चिद्रूपप्रतीति अनुसंधान । येणें इडा वामस्वरें प्राण । पुरवावा जाण सावध ॥ ८९ ॥ ऐसा स्थिरत्वें पूरकु करूनि । मग तो धरावा कुंभकें कुंभूनि । चित्त ठेवूनि अनुसंधानीं । सावधपणीं कुंभकु हा ॥ ९० ॥ इडे पूरकु एक गुण । कुंभक धरावा दीड गुण । मग दक्षिणे पिंगळेकरून । रेचावा पवन एक गुणें ॥ ९१ ॥ तुटो नेदून अनुसंधान । अभ्यासु हळूचि सावधान । त्रिकाळ दश आवर्तन । अभ्यास आपण करावा ॥ ९२ ॥ बरवा युक्त आहार करावा । प्रणवाभ्यास वाढवावा । 'सोऽहं' निजध्यास धरावा । स्वाधीन बरवा होय प्राण ॥ ९३ ॥ प्रणायाम करावा । तरी प्रत्याहार धरावा । युक्ताहारें बरवा । प्राण स्वभावा वश्य घडे ॥ ९४ ॥ युक्ताहारें जडत्व निरसे । स्थिर स्वस्थ आसन बैसे । कार्य साधे अनायासें । जरी असे युक्ताहार ॥ ९५ ॥ प्राणायाम प्रत्याहार केला । तेणें प्राण स्थिर झाला । आसनीं त्रिबंध दिधला । सावध राहिला एकाग्र ॥ ९६ ॥ ऐसा आसनजयो जाला । प्राणापान समत्वा आला । मग तो ऊर्ध्व चालिला । संघटला मणिपुरीं ॥ ९७ ॥ अधो दमितां निज प्राण । ऊर्ध्व चाले तो अपान ।

---

१ आंथरुण कुशांतें ( अ ). २ 'दृढ' हा शब्द ( अ ) प्रतींत नाहीं.
३ प्राणाभ्यास ( अ ). ४ अभ्यासें जयो ( अ ).

दोहींसि संगम जाण। मणिपुरीं आपण होतसे ॥ ९८ ॥ अंतरीं चिद्रूपप्रतीति। ज्याचेनि शब्द उमटती । वक्तृत्व करूनि स्थिरावती । तेचि स्फूर्ति प्रणवाची॥९९॥ तो तंव शब्दाक्षरातीत । मूळप्रकृतिसंयुक्त । अहंब्रह्म स्फूर्तिवंत । नाद भासत परारूपें ॥ १०० ॥ तो मूळापासोनि ब्रह्मरंधावरि । सकळ प्राणियांच्या शरीरीं । असोनि न कळे निर्धारीं । अभक्ता हरि कळेना ॥ १ ॥ ह्मणोनि अभ्यासी जन । होऊनियां सावधान । प्राणायाम आपण । करिती जाण प्रणवेसीं ॥ २ ॥ धरितां प्रणवप्रतीति । अनुहत भासे नादस्फूर्ति । प्राणायामें प्राणस्फूर्ति । प्रणवा अतीति मिळों लागे ॥ ३ ॥ प्राणाचें गमनागमन । राहे स्थिरावे चळण । कल्पना सांडूनियां मन । राहे तल्लीन उगेंचि ॥ ४ ॥ एवं मनपवन प्रणवाधारें । जिणोनियां साही चक्रें । चाले धैर्यनिर्धारें[1] । वैराग्य पुरें जरी होय ॥ ५ ॥ प्राण चालतां ऊर्ध्वगति । चक्राचे पदर फुटती । तेथें धैर्य पाहिजे विरक्ति । अन्यथा गति घडेना ॥६॥ धैर्ये कष्ट सोशिजे जरी । विरक्तीनें सिद्धि हाती न धरी । सिद्धीतें योग पावे तरी । अन्यथा कदीं चढेना ॥ ७ ॥ मनपवनप्रणवाधारें । जिणोनियां साही चक्रें । गेलिया योगी निर्धारें । समाधि भरे सुखरूप ॥८॥ लागेली[2] अनुहतध्वनि । अग्निचक्र वोलांडुनि । भ्रमरगुंफेंत येऊनि । सुखें सुखपणीं सभाग्य॥९॥ स्त्रावी कामधेनु बरी । दुधें वर्षे घरभरि । शिवशक्ति ऐक्यें पुरी । जीवत्वा उरी न उरेचि ॥ १० ॥ निरसूनि गेलें भवदुःख । योगिया जोडलें परम सुख । सुखें सुखरूप झाला चोख । योगी नेटका योगबळें ॥ ११ ॥ नुरोनियां मीतूंपण । अखंड लागे आत्मध्यान । सम समाधि जाली पूर्ण । हें एक साधन हठयोगें ॥१२॥ हठयोगयुक्तिनिरोपण । समाधिपर्यंत साधन । हें एक ऐसें लक्षण । कष्ट दारुण अवघड ॥ १३ ॥ ‘ किंचित् पक्वकषायाणां । हठयोगेन संयुतः ’ ह्मणोन । आचार्य बोलिला आपण । विशद जाण तें केलें ॥ १४ ॥ ज्यातें नाहीं भक्तियोग । त्यां बोलिला हठयोग । उपजे विरक्ति अनुराग । घडे संयोग सुखस्वरूपीं[3] ॥ १५ ॥ हें कष्टरूप साधन । महा अवघड दारुण । जावें पर्वत वोलांडून । तैसा जाण हा योग ॥ १६ ॥ तैसा नव्हे भक्तियोग । आवडी सज्जनसंयोग । नवविधा भक्तिमार्ग । स्वानंदभोग स्वतःसिद्ध ॥ १७ ॥ करितां नवविधा भक्ति । जडे भगवंतीं आसक्ति । आत्मनिवेदनस्थिति । सज्ञान करिती निजनिष्ठे ॥ १८ ॥ आचरतां क्रियारूप भक्ति। जडे भगवंतीं आसक्ति। तये प्रीतीनें विरक्ति[4] । सहज ऐती ठसावे॥१९॥ तया गुरुकृपे निजज्ञान।लागे स्वरूपीं अनुसंधान।मन होय ब्रह्मार्पण।समाधान स्वानंद ॥ २० ॥

---

१ धैर्यें निर्धारें ( अ ). २ यालागीं लागलिया ( अ ).

३ स्वरूपीं ( अ ). ४ तैशीच जडे विरक्ति ( क ).

भक्तीनें सामाधान पावती। सिद्धचि जोडे ब्रह्मस्थिति। शंकराचार्य रूपामूर्ति। सांगे गुरुभक्ति अवधारा ॥ २१ ॥

**परिपक्वं मनो येषां केवलोऽयं च सिद्धिदः।**
**गुरुदैवतभक्तानां सर्वेषां सुलभो जवात् ॥ ५६ ॥**

करितां अद्वैतभजन। स्वरूपस्थिति अनुसंधान। परिपक्वता पावे मन। निजध्यासन निजनिष्ठे ॥ २२ ॥ ये निष्ठे परिपक्वता। मन पावलें तत्वतां। विक्षेप आणि मला-याता। तुटोनि अखंडता बाणली ॥ २३ ॥ जंववरी तुटे अनुसंधान। तंववरी अपक्क असे मन। दृढ करितां अद्वैतभजन। परिपक्क मन होतसे ॥ २४ ॥ आंबा आंबट सहज असे। घालितां तृणशेजे जैसें। आम्लता सर्व नासे। गोड रसें मघमघित ॥ २५ ॥ जाणोनि अध्यात्मतत्वज्ञान। तेचि निष्ठा निजध्यासन। निःशेष नासे विपरीतज्ञान। मन समाधान परिपक्क ॥ २६ ॥ मन वेधोनि[१] तन्मय। परिपक्क स्वानंदमय। सिद्धस्थिति सहज होय[२]। पूर्णत्व स्वयें अधिकार ॥२७॥ परी हें होतां कठीण। अनिवार नाकळे मन। करितां नाना साधन। धरी अभिमान तेथेंचि ॥ २८ ॥ साधनीं साधक शिणले। मन न जाय आंकाळिलें। आंकळी तें वर्म चुकलें। मन क्षोभिले अधिकाचि ॥ २९ ॥ तरी याची आंकाळिती खूण। ज्या आवडे सद्गुरुभजन। पूर्णभावें अनन्य शरण। आवडी मन सुखावे ॥ ३० ॥ माझा स्वामी सद्गुरुनाथ। परात्पर परम दैवत। पूर्णब्रह्म मूर्तिमंत। भाग्यें प्राप्त मज झाला ॥ ३१ ॥ माझी जननी आणि जनक। सखा जिवलग सद्गुरु एक। ऐशिये आवडी भाविक। अनन्य सेवक सद्भावें ॥ ३२ ॥ हृदयीं न विसंबे गुरुचरण। मुखीं न विसरे गुरुस्मरण। सद्गुरूलागीं जीवप्राण। कुरवंडी आपण करीतसे ॥ ३३ ॥ गुरुसेवा घडे जंव जंव। चतुर्भुज[३] दिसे तंव तंव। सांडूनियां अहंभाव। दृढ सद्भाव गुरुचरणीं ॥ ३४ ॥ ऐशी मनातें परम प्रीति। अनन्य लागलीं गुरुभक्ति। अखंड प्रेम उथळे चित्तीं। आवडी पुरती गुरुचरणीं ॥ ३५ ॥ ऐशी आवडी प्रेमळ चित्तें। मनचि आंकळी मनातें। आवडी तुष्टोनि गुरुनाथें। वरदहस्तें कृपा कीजे ॥ ३६ ॥ ऐसा साचार सद्भाव। साचार प्रसन्न गुरुराव। स्वानंदसुखाचें[३] गौरव। हृदयीं स्वयमेव प्रगटे गुरु ॥ ३७ ॥ हृदयीं प्रगटे स्वानंद पूर्ण। हें गुरुदास्याचें फळ संपूर्ण। आणि अभक्त शिकले शब्दज्ञान। तरी अभि-मान वाढतु ॥ ३८ ॥ व्युत्पत्ती[४] वाढला अभिमान। कामक्रोधीं[५] सवळे मन। तेथें कैचें समाधान। वांछीं जनमान प्रतिष्ठा ॥ ३९ ॥ तेथें कामक्रोध हाणिती घाय।

१ बोधोनि ( अ ). २ होय ( अ ).

३ स्वानंदसुखाचा ( अ ). ४ व्युत्पत्ती वाढल्या ( अ ). ५ कामक्रोधें ( अ ).

नेणें प्रतिष्ठा ते विष्ठा होय । मूर्ख तेही निंदिती स्वयें । अभाग्यउदय अभक्ता॥ ४०॥ ज्ञान शिकावया गुरु केला । परी अनन्यभाव नाहीं धरिला । तेणें अभिमान वाढला। विघ्नें तयाला बुडविती ॥ ४१ ॥ असो ते परती अभक्तस्थिति । बोलतां श्रम वाचेप्रती । आतां धन्य जया गुरुभक्ति । सद्गुरुमूर्ति प्रसन्न ॥४२॥ सद्गुरुचरणीं अनन्यभक्त। ज्यासि सद्गुरु परम दैवत । स्वानंदसुख सदोदित । सुलभ प्राप्त अविलंबें ॥ ४३ ॥ पूर्ण देखोनि सद्भाव । प्रसन्न होय गुरुराव । स्वानंदसुख स्वानुभव । घडे स्वयमेव पूर्णस्थिति ॥ ४४ ॥ सद्गुरुचरणीं अनन्य शरण । तया नाहीं कष्टसाधन । प्रीतीनें सद्गुरु प्रसन्न । स्वानंद पूर्ण स्वयें देतु ॥ ४५ ॥ गुरुभक्ताचे चरणरेणु । स्वयें वंदी नारायण । मद्भक्त माझें देवतार्चन । अवतार[1] श्रीकृष्ण तयांलागीं ॥ ४६ ॥ जयराम श्रीकृष्णा शरण । म्हणे स्वामी कृपा[2] करून । गुरुभक्ताचे चरणरेणु । घाली पूर्ण माझे शिरीं ॥ ४७ ॥ कृष्णा मी तुझें लडिवाळ । बाप माझा तूं कृपाळ । गुरुभक्ताचें चरणकमळ । लावीं केवळ माझे निढळीं ॥ ४८ ॥ पाहतां गुरु आणि गुरुभक्त । तूंचि तूं पूर्ण भगवंत । माझ्या हृदयीं अखंडित । राहें संतत श्रीकृष्णा ॥ ४९ ॥ तुझे भक्तीचें महिमान । जाणसी तूंचि तूं आपण । कीं तुझ्या मूर्ति संतजन । भोगिती पूर्ण भक्तिसुख ॥ ५० ॥ भगवंत विषयो जाला मना । म्हणवूनि सांडिली कल्पना । पावले पूर्ण समाधाना । श्रीगुरुचरणा विनटोनि ॥ ५१ ॥ मी नेणें अन्य साधन । जीवन माझें तुझे चरण । कृष्णा तुझें नामस्मरण । योग संपूर्ण पैं माझा ॥ ५२ ॥ ज्ञान आणि निजध्यासन । सुख स्वानंद समाधान । सत्य श्रीकृष्णा तुझे चरण । वाहिलें मीपण तुझ्या चरणीं ॥ ५३ ॥ तुझ्या मूर्ति हे संतजन । परम प्रिय तुजलागून । त्यांच्या पायीं अनन्य शरण । लोटांगण अहर्निशीं ॥ ५४ ॥ आतां पुढील प्रकरण । परम गोड निरूपण । सांगेल आचार्य कृपाघन । मुक्तलक्षण सुचिन्ह ॥ ५५ ॥ इति श्रीअपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुखगौरव । जीवन्मुक्त स्थिति[3]अनुभव । प्रकरण स्वयमेव अकरावें ॥ १५६ ॥

ॐ नमो सद्गुरुदेवा । सिद्ध शांता सदाशिवा । श्रीकृष्णा महादेवा । कृपाळुवा सुखमूर्ति ॥ १ ॥ सुखमूर्ति तुझे चरण । ध्याती हरिहर अनन्य । सिद्ध योगी तुज शरण । तूझिये कृपेन सुखमय ॥२॥ गुरु स्वामी तुझा उपकार । उत्तीर्ण नव्हेती[4] योगेश्वर । स्तुतिस्तोत्र निरंतर । गाती उदार कीर्ति तुझी ॥ ३ ॥ कीर्ति तुझी स्वानंदमय। गातां मीपण विरोनि जाय । राहिले व्यासादिक तन्मय । हृदयीं पाय धरूनि

---

१ अवतरे ( अ ). २ कृपाघन ( अ ). ३ योगस्थितिनिजानुभव ( अ ).
४ न होती ( अ ).

तुझे ॥ ४ ॥ अनंता तुझे अनंत गुण । वर्णी ऐसा नाहीं कवण । आवडी धरिजे आंगवण । तंव मीपण हारपे ॥ ५ ॥

असितगिरिसमं स्यात्कज्जलं सिन्धुपात्रे
सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमुर्वी ।
लिखति यदि गृहीत्वा शारदा सार्वकालं
तदपि तव गुणानामीश पारं न याति ॥ ५७ ॥

मेरु मंदार पर्वत सकळ । तितुकीं मसी केलें काजळ । सिंधू एवढें पात्र प्रबळ । भरिलें केवळ उचंबळत ॥ ६ ॥ कल्पवृक्षाचिया श्रेष्ठ शाखा । आणि पृथ्वीचिया सकळ वृक्षां । करूनिया लेखणिया सुरेखा । पात्र देखा पृथ्वी सकळ ॥ ७ ॥ इतुकें घेऊनियां, लेखन । सर्वकाल सरस्वती आपण । करितां सर्वथा तुझे गुण । स्वामी पूर्ण न गणवती ॥ ८ ॥ ह्मणाल कधी लिहिते सरस्वती । तरी वेद शास्त्रें पुराणें स्मृति । कवि महाकवि वर्णिती[२] ॥ अथापि[३] न गणती गुण तुझे ॥ ९ ॥ अनंत पवाडे अनंत कीर्ति । मागां जाले पुढें होती । ह्मणोन सर्व काळ सरस्वती । करिते स्तुती प्रभु तुझी ॥ १० ॥ सज्जनमुखें वागेश्वरी । स्तुति करिते निरंतरीं । करितां मीतूंपणा नुरे उरी । स्वानंदसागरीं मन बुडे ॥ ११ ॥ ऐसे अनंत सुखी झाले । ते काये बोलवती योलें । स्वामी तवां सुखी केले । तें सुख वदले न जाये ॥ १२ ॥ येथें माझी प्रतीति मज । श्रीकृष्णा शरण आलों तुज । सिद्ध स्वानंद स्वराज्य । सभाग्य सहज मी झालों ॥ १३ ॥ एऱ्हविं मी तंव अनाथ । तुझिये कृपे जी सनाथ । स्वामी माझा तूं समर्थ । कृपावंता श्रीकृष्णा ॥ १४ ॥ श्रीकृष्ण नाम तुझें । हेंचि साचार भाग्य माझें । मी तूं हें नाठवे दुजे । सहज स्वराज्य स्वानंदु ॥ १५ ॥ स्वानंदाचें पूर्णपण । दृश्य[४] द्रष्टा कैंचें भान । चिद्त्वीं हारपलें[५] गगन । येकला आपण सदोदित ॥ १६ ॥ हे प्रतीत आपली आपण । भोग्य भोक्ता दुजा कवण । सहज स्वानंद परिपूर्ण । भावना भिन्न कैंची उरे ॥ १७ ॥ गुळें आपुलें गोडपण । चाखावें नलगे आपण । सहज स्वानंद परिपूर्ण । ह्मणतां कवण दुजा उरे ॥ १८ ॥ असो. ऐशिये स्थितीचे संत । सिद्ध स्वानंदीं डुल्लत । सिद्ध[६] योगी ते महंत । कैसे वर्तत देहस्थिति ॥ १९ ॥ त्यांचे स्थितीचें निरोपण । सांगे आचार्य कृपाघन । सज्जनीं द्यावें अवधान । कृपाळु पूर्ण बोलला ॥ २० ॥ मी जन्मलों येईल मरण । हा भ्रम नाहीं त्यांलागून । नित्य शाश्वत परिपूर्ण । सिद्ध आपण पूर्णत्वें ॥ २१ ॥

---

१ हा शब्द ( अ ) प्रतींत नाहीं. २ वर्णितां ( अ ). ३ अद्यापि ( अ ).
४ तेथें दृश्य ( अ ). ५ हारपे ( अ ). ६ सहज योगी ( अ ).

देहप्रारब्ध मिथ्या असे । तेणें ते वर्ततां दिसे । भलते ठायीं भासे नासे । संदेह नसे महामुक्ता[1] ॥ २२ ॥

**तीर्थे श्वपचगृहे वा नष्टस्मृतिर्वा परित्यजन्देहम् ।**
**ज्ञानफलकालसमये कैवल्यं याति गतशोकः ॥ ५८ ॥**

तया देहा तीर्थी मरण । अथवा श्वपचगृहीं जाण । अथवा देहीं असावधान । दिसतां अज्ञान स्पर्शेना ॥ २३ ॥ एवं परित्यागितां देहे । पूर्वींच नाहीं त्या संदेहे । ब्रह्मस्थिति प्राप्त आहे । न ढळे पाहें कल्पांतीं ॥ २४ ॥ ज्ञानफळ स्वानंदस्थिति । जे काळीं जाली प्राप्ति । देहबुद्धीची निवृत्ति । कैवल्य असती दुःखातीत ॥ २५ ॥ मिथ्या देहातें मरणकाळ । येतां न पालटे ज्ञानफळ । स्वानंदस्थिति जे प्रबळ । ते अढळ ढळेना ॥२६॥ मग तो पडो भलते ठायीं । चिंता सर्वथा तया नाहीं । आत्माराम तो विदेही । संदेहे कांहीं असेना ॥ २७ ॥

**रथ्यांतरे मूत्रपुरीषमध्ये चांडालवेश्मन्यथ वा श्मशाने ।**
**कृतप्रयत्नो ह्यकृतप्रयत्नो देहावसाने लभते च मोक्षम् ॥५९॥**

भलते वाटे मार्गावरी । मध्यें पडो मूत्रपुरीं । कीं मरण चांडाळघरीं । श्मशानीं जऱ्ही देहे पडे ॥ २८ ॥ प्रयत्न करोनि काशीस जावो । अथवा न करोनि तैसाचि राहो । त्यातें देह समूळ वावो । नाहीं संदेहो मरणाचा ॥ २९ ॥ देहातें भलते ठायीं मरण । परी तो पावे मोक्षसदन । मोक्ष पावे ऐसें वचन । हें[3] तों जाण पूर्वपक्ष ॥ ३० ॥ बंधमोक्षाची भ्रांति । पूर्वींच नाहीं ज्ञानियाप्रती । सहज संचली सिद्धस्थिति । ब्रह्मसंवित्ति परिपूर्ण ॥ ३१ ॥ जेथें अज्ञानआवरण । तेथें वासना दारुण । दृढ वाढला अभिमान । क्रिया आपण तैशीचि ॥ ३२ ॥ वासना अविद्याविद्यामय । तेणें बंध मोक्ष होय । स्वरूपाकार ते विद्या होय । इच्छाविषय अविद्या ते ॥ ३३ ॥ जिये वासने दृढ मन । धरूनि आवडी करी ध्यान । तेचि प्राप्ति घडे जाण । मोक्षबंधन यापरी ॥३४॥ ऐसेंचि रघुनाथालागूनि । स्वयें सांगे वसिष्ठमुनि । हें जाणावें मुमुक्षु जनीं । मोक्षबंधनी ते इच्छा ॥ ३५ ॥

**श्रूयतां ज्ञानसर्वस्वं श्रुत्वा चैवावधारयेत् ।**
**भोगेच्छामात्रको बन्धस्तत्त्यागो मोक्ष उच्यते ॥ ६० ॥**

वसिष्ठ ह्मणे रघुनाथातें । ऐक बापा सांगेन तूतें । ज्ञान सर्व ह्मणिजे त्यातें । ऐकोनि मनातें दृढ धरी ॥ ३६ ॥ विषयभोगीं इच्छा गहन । आसक्त अखंड ध्याय मन । इतुकें आहे दृढ बंधन । निश्चय जाण रघुनाथा ॥ ३७ ॥ आणि तये इच्छे त्यागु कीजे।या नांव मोक्ष बोलिजे।बंध मोक्ष यातें ह्मणिजे।बरवें जाणिजे श्रीरामा॥३८॥

---

१ महायुक्त ( अ ). २ होय ( अ ). ३ होतें जाण पूर्वपक्षी ( क ).

अज्ञान तें विषयध्यान । यालागीं बंधन[1] जन्ममरण । मिथ्या जाणोनि विषयभान[2] । सज्ञान निमग्न स्वानंदीं ॥ ३९ ॥ त्यागूनि अज्ञान विपरीत ज्ञान । निमग्न स्वानंदीं सज्ञान । विषयासक्ति नै धरी मन । सहज तल्लीन ब्रह्ममय ॥ ४० ॥ संचली सहज स्वानंदस्थिति । सुखदुःख नाहीं तयाप्रती । जन करितां निंदा स्तुति । नाहीं चित्तीं विक्षेपु ॥ ४१ ॥ देहा पूजिलें कीं गांजिलें । वंदिलें अथवा निंदिलें । मीपण सज्ञान सांडिलें । आचार्य बोले श्लोकार्थ ॥ ४२ ॥

अतिवादांस्तितिक्षेत नावमन्येत कंचन ।
न चैनं देहमाश्रित्य वैरं कुर्याच्च केनचित् ॥ ६१ ॥

तया ज्ञानिया योगियाप्रती । जन अतिवादें बोलती । एक करिती महास्तुति । एक निंदिती यथेष्ट ॥ ४३ ॥ एक पूजिती जाणोन । एक गांजिती नेणोन । परी त्या नाहीं देहाभिमान । न धरी सज्ञान सुख दुःख ॥ ४४ ॥ पारखें न म्हणे जो कोण्हातें । देखे आपआपणातें । किंचितही न धरी दुःखातें । शांति सुखातें भोगित ॥ ४५ ॥ नव्हे देहाचा आश्रित । देहाभिमान नाहीं धरित । परमानंदें नित्य तृप्त । निर्वैर असत निरपेक्ष ॥ ४६ ॥ अपेक्षेनें उपद्रवे[3] जन । अप्राप्तविषयीं क्षोभे मन । वैरासि[4] ठाव हाचि जाण । निरपेक्ष पूर्ण निर्वैर ॥ ४७ ॥ नव्हे जो देहाचा आश्रित । अपेक्षा न धरी ज्याचें चित्त । निर्वैर आत्माराम सत्य । सिद्ध शांत निजयोगी ॥ ४८ ॥ निश्चळ शांति निर्मळपण । नाहीं करणें आणि अकरणें । नाहीं बोलणें अबोलणें । सांगे लक्षण आचार्य ॥ ४९ ॥

न कुर्यान्न वदेत्किंचिन्न ध्यायेत्साध्वसाधु वा ।
आत्मारामोऽनया वृत्त्या विचरेज्जडवन्मुनिः ॥ ६२ ॥

शरीरीं कर्तृत्व कांहीं दिसे । मुखें बोलतांही भासे । परी तो कांहीं करित नसे । निर्वाण असे अनुभवें ॥ ५० ॥ मन ब्रह्माकार ब्रह्ममय । ह्मणोन ब्रह्मरूप इंद्रियें । ब्रह्मकर्म सहज होय । ह्मणोनि अक्रिय निजसाधु[6] ॥ ५१ ॥ कर्म ज्ञानिया अकर्मचि असे । अकर्मामाजी कर्म नसे[7] । कर्माकर्मत्व कायसें । सिद्धचि वसे स्वस्वरूप ॥ ५२ ॥ बोलतां दिसतो कांहीं शब्द । ते शब्द पाहतां निःशब्द । निःशब्दामाजी नाहीं शब्द । निःशब्द शब्द ह्मणे कवण ॥ ५३ ॥ ह्मणोनि कांहीं करित नसे । ना कांहीं बोलत नसे । ना कांहीं ध्यात नसे । सहज असे सहजपणें ॥ ५४ ॥ साधका साधन अद्वय । साधु सिद्धाचि ब्रह्ममय । आपआ-

---

१ बंध ( अ ). २ विषयध्यान ( अ ). ३ नुरे ( अ ).
४ अपेक्षेने उद्रवे ज्ञान ( अ ). ५ वैरा ठाव नाहींच जाण ( अ ).
६ सहज साधु ( अ ). ७ असे ( अ ).

पर्णी ध्यावें काय । ध्याता ध्येय दिसेना॥ ५५ ॥ पूर्वाभ्यासें वृत्तिनिवृत्ति । आधींच ते बाणली प्रतीति । साधु आत्मारामस्थिति । कवणाप्रती ध्याईल ॥ ५६ ॥ पूर्वाभ्यासें आपण । आंगी दिसे भक्तपण । परी तें अहेतुक भजन । ब्रह्म पूर्ण पूर्णत्वें ॥ ५७ ॥ ह्मणोनि कांहीं ध्यात नसे । आत्मारामाचि पूर्ण असे । ध्येय ध्याता तया न दिसे । ध्यान कायसें कवणाचें ॥ ५८ ॥ वृत्तीचे पोटीं भेदभान । तरी ते जाली आत्मा पूर्ण । आत्माराम तो आपण । वृत्ति निमग्न स्वस्वरूपी ॥ ५९ ॥ आत्माराम पूर्णपणी। जडवत विचरे निश्चळपणीं । निर्मळत्व अमन मनी । ह्मणोन मुनि आचार्य ह्मणे ॥ ६० ॥ ऐसे सिद्ध साधु सज्जन । त्यांचे आंगी हें लक्षण। सांगे आचार्य कृपाघन । सावधान परिसेसा॥६१॥

**अकिंचनस्य शांतस्य दांतस्य समचेतसः ।**
**सदा संतुष्टमनसः सर्वाः सुखमया दिशः ॥ ६३ ॥**

सर्वदा स्वानंदी निमग्न । काहीं न चिंती पदार्थभान । मी देह आणि हे जन । भावनाभान असेना ॥ ६२ ॥ अकल्पित कांहीं लाभु जाला । तेणें संतोष नाहीं त्याला । किंचित् लोभु नलगे त्याला । निश्चळ संचला निजसुखें ॥ ६३ ॥ पदार्थ गेलिया विषाद नाहीं । संग्रह करणें नलगे कांहीं । कांहीं न धरी अपेक्षाही । मोकळा पाहीं अकिंचन ॥ ६४ ॥ दांत ह्मणजे दमनशील । मन स्वानंदीं निश्चळ । इंद्रियां नाहीं हळहळ । तृप्त केवळ सर्वदां ॥६५॥ मनीं असतां तृप्तिबळ । इंद्रियें न करिती तळमळ । सहजाचि असे दमनशीळ । दांत केवळ सहजचि ॥ ६६ ॥ अंतरीं स्वानंदप्रतीति । अखंड बाणली विश्रांति । अंगा तेणें सहज शांति । क्षोभ चित्तीं असेना ॥ ६७ ॥ चित्ता चैतन्यीं अनुसंधान । तेणें चित्त चैतन्यघन । विषमभान भावी कवण । समसमान सहजचि ॥ ६८ । मन स्वानंदीं निमग्न असे। तेणें सदा संतुष्ट वसे । संतुष्टा संतुष्ट सर्व दिसे।तृप्ता भासे सर्व तृप्त ॥ ६९ ॥ ऐशी निष्ठा निज निर्वाण । स्वानंदमय जालें मन । इंद्रियीं नांदे तेंचि ज्ञान । क्रिया आपण सुखमय ॥ ७० ॥ जिये दिशेकडे पाहे । ते[3] सुखेंचि कोंदली आहे । सर्व दिशा सुखमय । स्वानंदें स्वयें कोंदला ॥ ७१ ॥

**निर्वासनो निरालंबः स्वच्छंदो मुक्तबंधनः ।**
**क्षिप्तसंस्कारवातेन चेष्टते शुष्कपर्णवत् ॥ ६४ ॥**

आपण सहज स्वानंदमय । आनंदलेश अवघे विषय । मन स्वस्वरूपीं तन्मय । सहज होय निर्वासना ॥ ७२ ॥ भुकेला धांवे प्रेत्न करूं । तृप्त सहज असे स्थिरु ।

---

१ ब्रह्मार्पण ( अ ). २ आपण ( अ ). ३ तें सुखाचि कोंदलें आहे ( अ ). ४ स्वयें ( अ ). ५ आनंदलें अवघें विषमय ( अ ).

मन अविकारी अविकारु । वासना धरूं विसरलें ॥७३॥ निर्वासना निरालंबस्थिती ॥ निष्ठा बाणली मनाप्रती । मनाचि जालें आत्ममूर्ती । नाठवे वृत्ति कल्पना ॥ ७४ ॥ ह्मणोनि साधु सज्ञान । स्वच्छंदें सहज आपण । क्रीडा करिती स्वानंदघन । पूर्णत्वें पूर्ण विचरती ॥ ७५ ॥ ते सहजाचि मुक्तबंधन । अथवा नाहीं मोक्षसाधन । बंध मोक्ष मिथ्याभान । तयांलागोन स्पर्शेना ॥ ७६ ॥ तम नातळे सूर्यातें । अज्ञान नातळे ज्ञान्यातें । सिद्ध स्वराज्य तयांतें । स्वानंदातें भोगिती ॥ ७७ ॥ प्रत्यक्ष वर्तती[1] स्वदेहीं । प्रारब्धें घडे सुखदुःखही । सुखदुःख तया कैसें नाहीं । आशंका पाहीं हे आली ॥ ७८ ॥ ज्ञानियां नाहीं देहात्मता[2] । देहीं न धरिती अहंता[3] । सिद्ध स्वानंदें तृप्तता । अखंडता बाणली ॥ ७९ ॥ तेथें देह मिथ्या मायिक[4] चिन्ह । सुखदुःखही मिथ्या भान । सुख येतां तो आपण । सुखावोन हरखेना[5] ॥ ८० ॥ लटकियाच्या लाभें सुख । मानिती ते अज्ञान मूर्ख । तेणेचि तयां घडे दुःख । नेणती सुख त्रिलोकीं ॥ ८१ ॥ सज्ञानातें दुःख येतां । देहासकट जाणे मिथ्या । धैर्य न सांडिती साहितां[6] । स्वानंदता निमग्न ॥ ८२ ॥ मिथ्या देहीं प्रारब्धभान । तेणें सुखदुःख येतं[7] ठाकुन । ज्ञानी न धरि देहाभिमान । धैर्यपूर्ण पूर्णत्वें ॥ ८३ ॥ कवडी सांपडे श्रीकांता । तरी काय लाभु त्या अनंता । तृणें हाणितां हनुमंता । काय वेथा पैं जाली ॥ ८४ ॥ ज्ञानी अनुद्वेग चिद्घन । मिथ्या देहीं प्रारब्धभान । तेणें ते वर्ते आपण । ज्ञानी गगन ऐसा स्थिरु ॥८५॥ गळित पत्रें वारेनें उडत । तेविं देह प्रारब्धें वर्तत । शुष्क पत्र वारेन चलत । देहे वर्तत प्राचीनें ॥ ८६ ॥ देहसंस्कारें वर्णाश्रमीं । सहज वर्ते स्वधर्मकर्मी । ज्ञानी अलिप्त देहधर्मीं । नाहीं उर्मी मीपणें ॥ ८७ ॥ जेधवां फिटलें अज्ञान । तेधवांचि गेला अभिमान । वासना गेली मावळोन । मोक्षरूप जाण निजयोगी ॥ ८८ ॥ या वेगळें मोक्षस्थान । ह्मणती केवळ अज्ञान । आचार्य ह्मणे सावधान । फिटे स्वप्न जागेरें ॥ ८९ ॥

**मोक्षस्य न हि वासोऽस्ति न ग्रामांतरमेव वा ।**
**अज्ञानहृदयग्रंथिनाशो मोक्ष इति स्मृतः ॥ ६५ ॥**

मोक्ष वसे आमके ठांई । ऐसें स्थळ नेमस्त नाहीं । मा भेटावें तया काई । दिशीं दाही[8] भेटेना ॥ ९० ॥ मोक्ष नाहीं कोण्हे गांवीं । मा धांवोनि भेटी घ्यावी । वस्त्रें करूनेयां कावीं । धावाधावी शिणताति ॥ ९१ ॥ तीर्थव्रतीं मोक्षप्राप्ति । ऐशीं पुराणें बोलती । तरी ते काय मिथ्या होती । आशंकिती येथें ऐसें ॥ ९२ ॥

१ वर्तता ( अ ). २ देहसक्तता ( अ ). ३ देहअहंता. ( अ ). ४ मायिकपणे ( अ ). ५ सुखावे ना हरखे ( अ ). ६ पाहतां ( अ ). ७ ये दु( अ ) ८ दिशे दाहीं( अ ).

तरीमुमुक्षें ऐका सावधान । प्रवृत्तीसि लाविले अज्ञान । अज्ञान मोक्षइच्छा धरून । साधनीं जन लाविले ॥ ९३ ॥ अज्ञाना सुबुद्ध विषयासक्ति । कुह्याले सुबद्ध आवर्ती । पुण्यक्षेत्रें तयांप्रती । संस्कार चित्तीं चित्तशुद्धि ॥ ९४ ॥ मोक्षइच्छा धरवून । देव द्विज गुरु प्राज्ञ । भजनां हरिकृपेन । मोक्ष पूर्ण पावती॥९५॥ ऐसें बोलताहे पुराण । मार्गी लाविले अज्ञान । भक्ति लागलिया अनन्य । कृपा पूर्ण देव करी ॥ ९६ ॥ हरि कृपाळू जाला । सद्गुरुरूप भेटों आला । अज्ञानभ्रम निरसला । मोक्ष दिधला निजज्ञानें ॥ ९७ ॥ एवं अज्ञाननिरासेविण । मोक्ष न घडे सत्य प्रमाण । उद्धव अर्जुन भक्तजन । ज्ञानें श्रीकृष्णें उद्धरिले ॥ ९८ ॥ उभे सांगितले आपण । जन्म घेतले ज्ञानेविण । शिवें दिधलें निजज्ञान । तेव्हां पूर्ण निजप्राप्ति ॥ ९९ ॥ मा तीर्थव्रतीं मोक्षप्राप्ति । केवळ घडे कैशा रीती । व्हावी अज्ञाननिवृत्ति । म्हणोनि प्रवृत्ति र्नेमिली ॥ १०० ॥ हृदयग्रंथि जें अज्ञान । त्यांत वासना विपरीत ज्ञान । त्यांत क्रिया देहाभिमान । दृढ बंधन प्राणिया [1] तीर्थव्रतें नेम करून । तेणें लागे हरिभजन । हरिभजनें निजात्मज्ञान । निरसे अज्ञान जीवाचें ॥ २ ॥ पिता शिकवी पुत्रासि । या रे वोनामा जरी लिहिशी । तरी खाशी आणि जेविशी । सुखें नांदसी संसारीं ॥ ३ ॥ असो. सद्गुरुरूपें निजात्म-ज्ञान । प्रकटतां निरसे अज्ञान । निरसोनियां विपरीत ज्ञान । देहाभिमान हारप ॥ ४ ॥ एवं हृदयग्रंथि जें अज्ञान । निरसे त्यौतें मोक्षसदन । सज्ञान स्वयें स्वानंदघन । मोक्षबंधन स्पर्शेना ॥ ५ ॥ आतां ग्रंथाच्या उपसंहारीं । शेवटील श्लोक निज निर्धारीं । शंकराचार्य गर्जना करी । दावी वरी संतरहणी ॥ ६ ॥

अहिमिव जनयोगं सर्वदा वर्जयेद्यः ।
कुणपमिव सुनारीं त्यक्तुकामो विरागी ॥
विषमिव विषयान्यो मन्यमानो दुरन्तान् ।
जयति परमहंसो मुक्तभावं समेति ॥ ६६ ॥

तेचि सज्जन परम श्रेष्ठ । परम वीतरागी वरिष्ठ । निजध्यासी निजनिष्ठ । अति बलिष्ठ राजयोगी ॥ ७ ॥ आत्माभ्यासीं परम प्रवीण । एकांतवासी अनन्य । जनमान संभाषण । नावडे जाण उपाधि ॥ ८ ॥ जेवि सर्प विखार दारुण । त्यांचा संयोग न धरी जन । तेविं जनसंगु आपण । सर्वथा जाण धरीना ॥ ९ ॥ सर्पसंगें विख चढे । जनसंगें उपाधि जडे । सर्पसंगें मरण घडे । पतन रोकडें जन्म-

---

१ संस्कार धरवून ( अ ). २ पावशी ( क ). ३ बोलती हीं पुराणें ( अ ). ४ सद्गुरुरूपें ( अ ). ५ निजज्ञानं ( अ ). ६ देहबंधन ( अ ). ७त्या नांव ( अ ).

संगें ॥ १० ॥ जनसंगें उपाधि । निष्ठा मोडे भ्रमबुद्धि ।[1] नातुडे स्वानंद समाधि । लागे व्याधिविषयरोग ॥ ११ ॥ लोखंड जरी होये सकळ । परी सांखळियापाशीं खळखळ । लोहोलाठा तो निश्चळ । नाहीं खळबळ अणुमात्र ॥ १२ ॥ सर्व भूतीं भगवंत आपण । परी साधका एकांत प्रमाण । जनयोगें विकारे मन । समाधान पूर्ण नव्हे ॥ १३ ॥ यालागीं सर्पवत जनयोग । मानूनि राहे जो निःसंग । सांडूनि जन वृत्तिभाग । निष्ठा निजांग न सोडी ॥ १४ ॥ कीं सर्प जैसा पाहें । जनसंगीं क्षण न राहे । जनसंगें मरण आहे । ह्मणवूनि वसताहे एकांतीं ॥ १५[2] आणि पाहतां जैसें प्रेतशरीर । दिसे परम भ्यासुर । परम कश्मळ अपवित्र । त्यातें पवित्र स्पर्शेना ॥ १६ ॥ प्रेत देखोनि कंटाळे मन । मा काय देखेल आलिंगन । तेवीं अस्तुरीदेहो[3] देखोन । अंतरींहून कंटाळे ॥ १७ ॥ या अस्तुरीदेहाच्या आवडी । भोगिल्या जन्ममरणाच्या कोडी । नाना दुःखांचिया जोडी । जोडिल्या गोडी[4] भ्रमें धरूनि ॥ १८ ॥ अधोद्वारीं लागली प्रीति । ह्मणोन त्यांताचि घडली वस्ती । बहु वेळां ये कुश्चिति । दुःखावर्तीं बुडाले[5] ॥ १९ ॥ अस्तुरीदेह केवळ अघोर । त्यांत अघोर मळमूत्रद्वार । विटाळें वाहे निरंतर । परम अपवित्र प्रत्यक्ष ॥ २० ॥ मूर्खीं येथ धरिली प्रीति । नरका भोग सत्य मानिती । तेणें त्यांतें[6] निमग्न होती । यातना भोगिती जन्ममरण ॥ २१ ॥ अपार भोगिली गर्भव्यथा । बहु दुःख होय उपजतां[7] । योनिभोगीं आसक्त । धरूनि मागुता बैसतु ॥ २२ ॥ योनींतूनि आला दिसे । योनिभोगीं आसक्त असे । मागुता गर्भामाजी वसे । पुन्हा तैसें मागुतें ॥ २३ ॥ मागें पुढें असे योनि । मध्यें आसक्ति तिचीचि[8] धरूनि । योनिआंतु बुडाले प्राणी । भ्रमें करूनि अस्तुरीसंगें ॥ २४ ॥ उपजतां माता मागुती कांता । कांता माता पुन्हां ह्मणतां । एवं पतना अतौता । नेला ममता पत्नीनें ॥ २५ ॥ आसक्त पुरुषा पतना नेत । ह्मणोनि पत्नी नाम सत्य । प्रत्यक्ष अघोर भोगवीत । मूर्तिमंत पतन हें ॥ २६ ॥ काजळकुंकू घालली वेणी । नटली वस्त्रीं आभरणीं । प्रत्यक्ष पुरुषा भुलवूनि । घाली पतनीं अघोरीं ॥ २७ ॥ हावभाव आप्तता दावी । काम चेतवी पुरुषा गोंवी । स्वहितस्वार्थातें विसरवी । घाली रवरवीं मोहोभ्रमें ॥ २८ ॥ घोळसूनि मारी भावार्थातें । वैराग्यातें दडपी लाते । विषयासक्ति विवेकातें । करी

---

१ भ्रमे बुद्धि ( अ ).

२ ( अ ) प्रतींत येथील १४ वी ओंवी ही पंधरावी आहे; व पंधरावी ती चौदावी आहे. ३ स्त्रीदेहो ( अ ). ४ कोडी ( अ ). ५ बुडालों ( अ ).

६ त्यांत ( अ ). ७ जन्मतां ( अ ). ८ चित्ती ( अ ).

निरुतें आंधळें ॥ २९ ॥ अस्तुरी[1] हे पतनाचि रोकडी । दुःख भोगवी अनंत कोडी ।
ऐशिया स्त्रियांची आवडी । जिची गोडी मूर्खीं धरिली ॥ ३० ॥ आप्त ऐसा मानिला वैरी । सुख मानिले व्याघ्रविवरीं । निद्रा केली विवशी घरीं । भ्रमें करी[2] भ्रांतें[3] जनीं ॥ ३१ ॥ सवे चोर मानिला सांगाती । मैंदाची धरिली संगती । मऊ अंग सर्पाप्रती । ह्मणोनि हातीं धरूं धांवे ॥ ३२ ॥ कटकटा न कळे कैसे । देखत देखत जाले पिसे । अघोर नरक भोगित असे । अघोरी वसे अघोरीं ॥ ३३ ॥ प्रत्यक्ष हें स्त्रीशरीर । महा अमंगळ अघोर । ते देहबुद्धि अपवित्र । वासना दुर्धर[4] स्त्रीरूपें ॥ ३४ ॥ प्रत्यक्ष देहे प्रेतरूप । महा दुस्तर स्त्रीस्वरूप[5] । हें जाणोनि धरिला अनुताप । योगी निष्पाप ब्रह्मस्थिति ॥ ३५ ॥ सांडिला भ्रम विषयकाम । अणुमात्र मनी न धरी प्रेम । अद्वय भक्त आत्माराम । सहज निष्काम निःसंग॥ ३६ ॥ विषरूप हे विषय जाण । ह्मणोनि विषय नामाभिधान । सुखसें वाटे भ्रमेंकरून । परी हे पूर्ण दुःखमय ॥ ३७ ॥

**विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ६७ ॥**

विषयेंद्रियसंयोगवशें । अग्रीं सुख अमृता ऐसें । परिपाकीं तों विषचि असे । सुखसें भासे रजोगुणें ॥ ३८ ॥ जैशी बचनागाची कांडी । खातां गोड लागे तोंडीं । शेवटीं पाडी मुरकुंडी । तळमळ कोडी दुःखांच्या॥ ३९ ॥ पदार्थविषयीं धरितां प्रीति । भ्रम चढे जडे आसक्ति । नाना उपायी भ्रमती । पडिलें स्वहितीं विस्मरण॥ ४० ॥विषयसुख भ्रममात्र । श्रमचि[6] घडे निरंतर । वायां गेलें नरशरीर । पुढें अघोर दारुण ॥ ४१ ॥ येणें नरशरीरें आपण । जोडे भगवंत निधान । तेणें नरशरीरें पतन । जोडिती अज्ञान विषयभ्रमें ॥ ४२ ॥ येथें आशंका निर्माण । जे देहासि विषय जीवन । शरीर न राहे येणेंवीण । कैसे सज्जन नांदती ॥ ४३ ॥ तरी जैसें भाडियाचें ढोर । त्यासि दीजे तृण आहार । आणि वाहिजे निरंतर । लाभ थोर देखोनि ॥ ४४ ॥ तेविं विरक्त ज्ञानिये भक्त । क्षुधानिवारण अन्नमात्र । शीतनिवारण मळतें वस्त्र । निर्वाहामात्र पै घेती ॥ ४५ ॥ धड गोड पाहणें नाहीं । आसक्ति न धरी कोठें कांहीं । भवगर्द्धजनीं[7] स्त पाहीं । इंद्रियें सर्वही भक्तिक्रिय ॥ ४६ ॥ जनघसणी प्रतिष्ठा मान । आवडी न धरी मनींहून । अखंड करी भगवद्भजन[8] । सावधान निजनिष्ठा ॥ ४७ ॥ सर्वदां आवडे एकांत । अनुसंधानीं एकाग्रचित्त ।

---

१ स्त्रीदेह ( अ ). २ करी ( अ ). ३ भ्रांति ( अ ). ४ रिघे ( अ ).
५ स्त्रीरूपें ( अ ).
६ भ्रमचि ( अ ). ७ जन ( अ ). ८ भगवंत भजनीं ( अ ).

स्वरूपस्थिति सावध रत । स्वानंदभरित सर्वदा ॥ ४८ ॥ निरपेक्ष निःसंग निराभिमान । निर्वैर शांत समदर्शन । निर्विकार समाधान । स्वानंदपूर्ण पूर्णत्वें ॥४९॥ ऐसा सुखमूर्ति योगेश्वर । सिद्ध प्रत्यक्ष सर्वेश्वर । मुकुटीं वंदिती हरिहर । महिमा अपार हरि वर्णी ॥ ५० ॥ परम योगी ब्रह्ममूर्ति । देव ऋषि तथा वंदिती ॥ जयजयकारें धन्य ह्मणती । करिती स्तुति सनकादिक ॥ ५१ ॥ श्रीशंकराचार्य आपण। जयजयकारें गर्जोन । ह्मणे परमहंस नारायण । धन्य पावन निजनिष्ठा ॥ ५२ ॥ धन्य धन्य हे निष्ठावत । समाधानी सिद्ध शांत । श्रीकृष्णाचि मूर्तिमंत । सद्गुरुनाथ संतरूपें ॥ ५३ ॥ ज्याचें करितां नामस्मरण । महापापा निर्दळण । कामक्रोधा निर्दाळून । करी पावन भाविकां ॥ ५४ ॥ ज्याचें होतांचि दर्शन ॥ आवडी वेधोनि राहे मन । प्रेम वोसंडे परिपूर्ण । हरिखें गगन कोंदाटे ॥५५ ॥ पहा पां परिस सद्गुरुचरण । भावें करितांचि स्पर्शन । पालटे मनाचें मनपण । प्रगटे आपण शुद्धसत्व ॥ ५६ ॥ ऐकतां ज्याचें प्रतापवचन । विरे अज्ञान ज्ञानाभिमान । हरपोनि जाय मीतूंपण । स्वानंद पूर्ण हेतुरहित ॥ ५७ ॥ हेतुरहित स्वयें स्वानंद । सद्गुरुवचनें निजात्मबोध । प्रतीति नांदे अनुभवसिद्ध । ह्मणोनि अगाध गुरुवचन ॥ ५८ ॥ ह्मणोनि वेद शास्त्रें पुराण । महिमा वर्णिती बंदीजन । सद्गुरुवचनें निजात्मज्ञान । स्वानंद पूर्ण निजभक्तां ॥ ५९ ॥ करितां वेदशास्त्रपठण । घडे वित्पत्ति व्याख्यान । परी सद्गुरुकृपेविण । अनुभव पूर्ण नाकळे ॥ ६० ॥ येथें पंडित ऐसें ह्मणती । शास्त्रें सांगे तोचि गुरुमूर्ति । शास्त्रविचार वित्पत्ति । ज्ञानप्राप्ति सहजेंचि ॥ ६१ ॥ हें तंव होय पंडितवचन । परी ब्रह्मनिष्ठा सद्गुरुविण । न पविजे ना समाधान । अज्ञानआवरण फिटेना ॥ ६२ ॥ वेद शास्त्र वित्पत्ति पाहें । युक्ति अभिमान वाढताहे । भ्रांति विक्षेप त्यांतचि आहे । विश्रांति सहे अति दुरी ॥ ६३ ॥ आह्मी ज्ञाते परम श्रेष्ठ । हें जगीं होणें प्रगट । सभेमाजी युक्ति हट । धरूनि उद्भट वाद करिती ॥ ६४ ॥ वरीवरी नम्रता दावणें । अंतरीं द्वेषाचें ठाणें । पाहती एकएकाचें उणें । प्रतिष्ठेकारणें जल्पती ॥ ६५ ॥ नाहीं भगवंतीं अनन्य । न धरी वैराग्यआंगवण । नलगे स्वरूपीं अनुसंधान । समाधान केविं घडे ॥ ६६ ॥ वचनीं वित्पत्ति दिसे । अंतरीं समाधान नसे । वक्तृत्वें झाले पिसे । जन मानें ऐसे भुलले ॥ ६७ ॥ ह्मणोनि भक्ति धरावी अनन्य । धरावी वैराग्यआंगवण । ब्रह्मनिष्ठ सद्गुरु सज्ञान । त्यांतें शरण रिघावें ॥ ६८ ॥ देखोनि अनन्यभाव । प्रसन्न होय गुरुराव । निजा-

---

१ प्रगट आपण शुद्धसत्वें ( अ ). २ हा शब्द ( अ ) प्रतींत नाहीं. ३ शास्त्रसंग ( अ ).

त्मप्रतीति अनुभव । स्वानंद स्वयमेव कोंदाटे ॥ ६९ ॥ ब्रह्मनिष्ठ सद्गुरुनाथ । सुखस्वानंदें डुल्लत । निराभिमान सिद्ध शांत । मूर्तिमंत श्रीकृष्ण ॥ ७० ॥ त्याचे चरणीं धरितां भाव । भ्रांति विक्षेप होय वाव । स्वानंद सुखाचा अनुभव । विरे अहंभाव सुखसिद्धि ॥ ७१ ॥ हा मी अनुभव दावूं किती । ज्ञानी जाणती प्रतीति । सद्गुरुचरणीं अनन्य प्रीति । तेचि भोगिती स्वानंदु ॥ ७२ ॥ असो स्वानंदसुखाचा दाता । तूंचि एकु सद्गुरु शांता । श्रीकृष्णा कृपावंता । चरणीं माथा अनन्य ॥ ७३ ॥ स्वानंदसुख संचलें स्वयें । सत्य श्रीकृष्णा तुझे पाय । यावरी आतां बोलों काय । झालें तन्मय मीपण ॥ ७४ ॥ हा ग्रंथ अपरोक्षानुभूति । शंकराचार्य कृपामूर्ति । बोलिला रोकडी प्रतीति । गुरुभक्तीं भोगावी ॥ ७५ ॥ हा ग्रंथ ऐसा आहे । मन घाली तो प्रतीत लाहे । हें मी बोलूं बहु काय । आवडी पाहे तो धन्य ॥ ७६ ॥ अमृताची निज गोडी । चाखितां जाणिजे रोकडी । येथें धरिलिया आवडी । जोडे जोडी स्वानंदु ॥ ७७ ॥ वेदशास्त्रांचें निजसार । बोलिला आचार्य शंकर । येथें नाहीं हो उदार । अनुभवें[2] उदार हा ग्रंथु ॥ ७८ ॥ रोकडी सुखाची प्रतीति । म्हणोनि नाम अपरोक्षानुभूति । धन्य धन्य ते पाहती । धन्य आइकती आवडी॥७९॥ नलगे करणें शास्त्रीं[3] शीण । नलगे अन्यत्र साधन । सद्गुरुकृपें अनन्य । ग्रंथनिधान पाहणें हा ॥ ८० ॥ श्रीकृष्ण प्रसन्न होऊनि मज । हातीं दिधला हा ग्रंथराज । टीकामिसें अनुभव सहज । दिधलें गुज अंतरींचें ॥ ८१ ॥ मी तव नव्हे संस्कृतज्ञाता । परी कृपा केली[4] गुरुनाथा । कर ठेवूनियां माथां । टीका तत्वतां करविली ॥ ८२ ॥ आशंका घेऊनियां फार । उदंड करावा विस्तार । तरी हा ग्रंथसार । आहे उदार अनुभवें ॥ ८३ ॥ येथें बहु वित्पत्ति लाविती । सिद्धांत न कळे तत्वतां । युक्तिप्रवाहीं पडतां । अनुभवार्थी दुराविजे ॥ ८४ ॥ जैसें समुद्रमंथन करितां । रत्नें निघालीं तत्वतां । आलीं देवांचिया हाता । भोगिती आतां हेचि कीं ॥ ८५ ॥ येथें एखादा म्हणे । समुद्रीं घालूनियां रत्नें । काढूनियां स्वयें भोगणें । धरी आंगवण तरी तो शिणु॥८६॥ समुद्रीं रत्नें टाकूनि पाहें । काढूनि भोगीन म्हणताहे । तो कधीं भोगु लाहे । शोधिताहे समुद्र जो ॥ ८७ ॥ तेवीं वेदशास्त्रींचें सार । शंकरें काढिलें साचार । भक्ता सदैवा अपार । जोडली सैंधर सुखसिद्धि ॥ ८८ ॥ येथें फार वित्पत्ति कीजे । आणि ग्रंथ पसरीं घालिजे । थित्या अनुभव दुराविजे । हें कां कीजे उगेंचि॥८९॥ म्हणोनि फार पसरु सांडोनि । टीका आहे प्रमितवचनीं । अनुभव बाणे त्वरेकरूनि

---

१ तत्काळ जाये देहात्मभाव ( अ ). २ अनुभव उदार ( अ ). ३ शास्त्र शीण ( अ ). ४ आली ( अ ). ५ सादर ( अ ). ६ ग्रंथ ( अ ).

तैशी रहणी दाविली ॥९०॥ सद्गुरुरूपें बोबडा वचनीं । बोलिलों जीं कान धरूनि ॥ न्युन्य पूर्ण संतजनीं । करावें कृपेनि कृपाळुंवीं ॥९१॥ हा ग्रंथ अपरोक्षानुभव । सद्यः-सुखाचें गौरव । भक्त भोगिती स्वयमेव । पूर्ण सद्भाव सुखसिद्धि ॥९२॥ हा ग्रंथ ऐसा आहे । आवडी पाहे तो प्रतीत लाहे । यावरी बोलों बहु काये । आवडी पाहे सभाग्य तो ॥९३॥ अमृताची निज गोडी । सेवी तो जाणे रोकडी । तेविं ये ग्रंथीं आवडी । धरी त्या जोडी स्वानंदु ॥९४॥ सद्गुरुकृपा धडफुडी । तयासि ये ग्रंथीं आवडी । सभाग्या प्राप्त परवडी । चवि रोकडी जाणती ॥ ९५ ॥ सूर्य देखिलिया साचार । दृष्टी न पडे अंधःकार । तेविं हा ग्रंथ उदार । दे अपार सुखसिद्धि ॥ ९६ ॥ जें सकळ शास्त्रांचें निजबीज । उपनिषदांचें गुह्य गुज । सिद्ध स्वानंद स्वराज्य । शंकरें सहज बोलिलें ॥९७॥ शंकर माउली कळवळोनि । भक्ता बाळकालागूनि । लाविलें निजात्म-स्तनपानीं । दिधली धणी स्वानंदु ॥ ९८ ॥ भक्त प्रेमळ सद्बुद्धि । त्याप्रतीं हे सुखसिद्धि । सिद्ध करूनि कृपानिधि । वाढिलें त्रिशुद्धि पर-मान्न ॥ ९९ ॥ हें परमान्न भोजन करी । तया वंदिजे हरिहरीं । ब्रह्मस्थिति त्याच्या करीं । स्वानंद अंतरीं न समाये ॥ १०० ॥ भक्ता भोक्तयाप्रती । माझी हे तों अनन्य विनंति । सावकाश सुखप्रतीति । तुमची आइती तुह्मी भोगा ॥ १ ॥ मी प्रार्थितों येणें भावें । सज्जनीं आपुला ह्मणावें । तुमच्या प्रसाद-गौरवें । मज स्वभावें विश्रांति ॥ २ ॥ श्रीशांत सद्गुरु सदाशिव । शंकरु आचार्य महादेव । बोलिला हा अपरोक्षानुभव । पाहे त्या स्वयमेव सुखसिद्धि ॥ ३ ॥ कृष्णदास जयराम ह्मणे । सद्गुरूचेनि प्रसन्नपणें । अपरोक्षानुभव पावणें । सावध भोगणें स्वानंदु ॥ ४ ॥ नीळकंठ काशीपति । श्रीशांत श्रीकृष्णमूर्ति- । रूपें हे अप-रोक्षानुभूति । सिद्ध आइती स्वानंदता ॥ ५ ॥ इति श्रीअपरोक्षानुभव । शंकरोक्ति सुखगौरव । जीवन्मुक्तिस्थितिअनुभव । प्रकरण स्वयमेव बारावें ॥ २०६ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

१ कृपाळूंनीं (अ). २ निज (अ). ३ धरीं (अ). ४ सद्भावें (अ). ५ स्वानंदा (क).